# नवभारत

वर्ष ८ वें ] ऑगस्ट १९५५ [ अंक ११ वा



— कविता, पुस्तक-परामर्श —

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# ' नवभारत ' निधि

## -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ' नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारांस ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे जुलई १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्री. बी. जी. गाढे ( हैदराबाद ) | १०० |
| श्री. विनायकराव बामनराव डोईफोडे ( नांदेड ) | १०० |
| श्री. उ. रा. बोगावत ( अहमदनगर ) | १०० |
| श्री. विनायकराव कोरटकर ( हैदराबाद ) | १०० |
| श्री. मु. रा. दामले ( मुंबई ) | ५० |
| श्री. ' अ ' ( नासिक ) | २५ |
| प्रा. द. रा. बेन्द्रे ( सोलापूर ) | १० |
| | ४८५ |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रकम | ३०६८ |
| एकूण | ३५५३ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४" या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।७।१९५५ पुणें ४

**कृ. ना. फडके** }
**मा. प. मंगुडकर** } कार्यवाह



अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें
अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट
१९५५

संचालक : श्री. शंकरराव देव
संपादक-मंडळ
आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, ऑगस्ट १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वीं त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे — कां. सं. ]

श्री. प्रद्युम्न टंकसाली ( मुधोळ )— एक उदयोन्मुख लेखक.

प्रा. सुरेश म. डोळके — नागपूर महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक.

प्रा. माधव मनोहर — मुंबई येथील नाथीभाई ठाकरसी महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक.

प्रा. अ. भि. शहा — पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांत व पुणें विद्यापीठांत गणिताचे प्राध्यापक.

श्री. वि. अ. पटवर्धन — पुणें येथील आर्यभूषण मुद्रणालयाचे व्यवस्थापक. 'संस्थानी लोकशाहीचा लढा ' या पुस्तकाचें संपादन त्यांनीं केलें असून त्यांतील कांहीं भागहि लिहिला. आहे.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

प्रा. ना. अ. मावळंकर

# विज्ञानाचे आधुनिक समाजावरील परिणाम

आपलें युग हें विज्ञानाचें युग आहे. 'चिंतेचें युग' किंवा 'विफलतेचें युग' म्हणूनहि तें संबोधिलें जातें. परंतु हीं सर्व अभिधानें आजच्या काळच्या विज्ञानवाद-जन्य ( Scientistic ) स्वरूपांतून जन्माला आलेलीं आहेत. आपल्या सर्व समस्या आणि चिंता यांचें मूळ आधुनिक विज्ञानाचा प्रारंभ आणि विकास यांमध्यें आहे.

बेकनच्या काळापासून विज्ञान सतत आगेकूच करीत आलें आहे. त्याचाच परिणाम म्हणून आजचा मानव निसर्गावर आपली अधिसत्ता गाजवीत आहे. विज्ञानाची ही प्रगति औद्योगिक क्षेत्रालाहि लागू केल्यामुळें लोकांचें भौतिक जीवनमान उंचावलें आहे. या पूर्वीच्या कोणत्याहि कालखंडापेक्षां आजची जगाची लोकसंख्या मोठी आहे आणि लोकांचें आजचें जीवनमानहि उच्चतर आहे. परंतु निसर्गामध्यें बदल घडवून आणीत असतांना मनुष्य आपल्या स्वतःमध्यें देखील परिवर्तन करीत असतो असें म्हणतात तें खरें आहे. निसर्गाशीं नवे संबंध निर्माण करीत असतांना माणसें आपापसांतील परस्परसंबंधहि बदलीत असतात. हा परस्पर-संबंधांतील बदल मात्र न कळत होत असतो. निसर्गांतील गूढें उकलण्याच्या कामामध्यें मनुष्य आतांपर्यंत इतका गढून गेला होता कीं त्यामुळें त्याला बदललेल्या सामाजिक संबंधांचा अभ्यास करायला वेळहि मिळाला नाहीं आणि तेवढी इच्छाहि राहिली नाहीं.

## आधुनिक समाजाचा उदय

मध्ययुगामधून आजच्या युगामध्यें झालेल्या संक्रमणाची कथा आतांपर्यंत अनेकांनीं अनेक वेळां सांगितली आहे. प्रा. लास्की यांनीं 'The Rise of European Liberalism' या ग्रंथामध्यें याचें विवरण केलें आहे. मध्ययुगीन समाज हा बहुतांशीं एकसंध आणि स्थितिशील होता. परलोक आणि पुनर्जन्म या कल्पनांचा त्याच्यावर पगडा होता. चालीरीती, रूढी, धर्मसंस्थेनें घातलेले विधिनिषेध यांचेंच प्राबल्य जीवनाच्या सर्व क्षेत्रांत त्या काळांत माजलें होतें. व्यक्ति-व्यक्तीमधील संबंध त्यांच्या सामाजिक दर्जावरून ठरविले जात होते. समाजव्यवस्थेमध्यें प्रत्येकाचें कार्यक्षेत्र निश्चित केलें गेलें होतें. जो सामाजिक दर्जा ज्याला जन्मतःच प्राप्त झाला असेल तेथेंच त्यानें रहाणें भाग होतें. वर चढून जायला समाजानें शिडी ठेवलीच नव्हती. माणसाच्या बारश्यापासून बाराव्यापर्यंत जीवनांतील सर्व महत्त्वपूर्ण प्रसंग रूढ धार्मिक विधिनिषेधांनीं बद्ध झाले होते.

या शब्दप्रामाण्यवादी पद्धतीचा उच्छेद होऊनच आधुनिक समाजव्यवस्थेस प्रारंभ झाला. युरोपमधील धर्मसंस्थेचा तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत ऱ्हास होत गेला व त्यानंतर जी नवजीवनाची व धर्मसुधारणेची चळवळ बहरून आली त्यामुळें खऱ्या बौद्धिक क्रांतीस प्रारंभ झाला. मानवतावाद्यांनीं नवी जीवनदृष्टि प्रतिपादली. मानवाला जीवनांतील नव्या आनंदाचा साक्षात्कार झाला. हें जग देखील चांगलें आणि जगण्यास योग्य आहे याचा प्रत्यय आला. बुद्धिवादी चिकित्सेची वृत्ति सगळीकडे बळावूं लागली. जुन्या जीवनमूल्यांबद्दल माणसें साशंक बनलीं. विचारवंत प्रत्येक गोष्ट बुद्धिप्रामाण्यवादाच्या निकषावर घासून पाहूं लागले.

या जिज्ञासु, तळमळीच्या व खळबळीच्या प्रवृत्तींतूनच आधुनिक विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांचा जन्म झाला. त्यामुळें दोन शतकांच्या आंतच जुनी शब्दप्रामाण्यवादी, परंपरागत, पुराणप्रिय समाजव्यवस्था अस्तंगत झाली व नवा गतिमान्, आक्रमणशील समाज उदयाला आला. या नव्या समाजानें आपल्या वर्धिष्णु सामर्थ्याच्या जोरावर सदैव नवे नवे प्रयोग आरंभले.

## व्यक्तीची बंधमुक्तता

वैज्ञानिक प्रगतीचा आधुनिक समाजावरील परिणाम सूत्ररूपानें सांगायचा झाल्यास तो 'व्यक्ति बंधमुक्त झाली' या शब्दांत सांगतां येईल. नव्या जगाचा ( अमेरिकेचा) शोध व औद्योगिक क्रांति यांमुळें उत्पादनक्षमता व दळणवळण हीं अमर्याद प्रमाणावर शक्य झालीं. व या शक्यतेमुळें धर्मातीत, धर्मनिरपेक्ष, ऐहिकप्रधान जीवनदृष्टि येणें अपरिहार्य झालें. जीवनापुरतें किमान उत्पादन करण्याची जुनी पद्धति टाकून देऊन ती ऐवजीं अमर्याद उत्पादन काढण्याची प्रथा अवलंबिल्यावांचून या नव्या संधीचा पूर्णांशानें फायदा घेतां येण्यासारखा नव्हता. हें उत्पादन बाजारपेठेंत येणें आवश्यकच होतें. या व्यापारी भरभराटीच्या आड धर्मसंस्था येऊं म्हणेल तर तिचें








कोण चालूं देणार ? उलट, आपल्या या उद्योगधंद्यांत व व्यापारांत यश येत आहे, व भरभराट होत आहे याचा अर्थ ईश्वराला हे सर्व मार्ग मान्य आहेत असा होऊं लागला. धर्म ही परमेश्वर आणि भक्त यांच्यांमधील खाजगी बाब ठरली. त्यामुळें व्यक्ति ही धर्मसंस्थेच्या बंधनांपलीकडे जाऊन स्वतःचें सुख साधण्यास सर्वस्वीं मुक्त झाली होती.

उद्योगधंद्यांतील झपाट्यानें झालेली अनन्यसाधारण प्रगति ही खाजगी भांडवलदारांच्या साहसप्रिय प्रवृत्ती-मुळें घडून आली. त्यामुळें व्यापार-उदीम आणि उद्योगधंदे नियंत्रित करणारे मध्ययुगीन विधिनियम त्याज्य ठरले होते. छोट्याछोट्या महाजनसंघां-( guilds )चें युग संपुष्टांत आलें होतें. पुढें प्रगति व्हावयाची असेल, तर त्याकरितां 'मुक्त स्पर्धा' असणें आवश्यक होऊन बसलें.

सर्व सत्ता धर्मसंस्थेकडून राज्यसंस्थेकडे गेली खरी. पण भांडवलदारवर्गाच्या उदयामुळें राज्यसंस्थेच्या क्षेत्राला फार मर्यादा पडली. अठराव्या शतकांतील आशावादी विचारांचें अॅडम स्मिथनें मोठें वैशिष्ट्यपूर्ण वर्णन केलें आहे. तो म्हणतो : "व्यक्तीला आपल्या हित-रक्षणाचें जास्तींत जास्त स्वातंत्र्य देण्यानेंच समाजहित आपोआप साधलें जाणार आहे. कमींत कमी सत्ता गाजविणारे सरकार हेंच सर्वोत्कृष्ट सरकार होय." मध्य-युगीन काळांत व्यक्तीचें जीवन हुकुमशाहीच्या चौकटींत जखडून पडलें होतें. पण वैज्ञानिक प्रगतीमुळें धर्मविचार, व्यापार-उद्योग, राजकारण, सामाजिक जीवन यांमध्यें जसजसें परिवर्तन घडून येऊं लागलें, तसतशीं ही मध्ययुगीन समाजव्यवस्था नष्ट होऊं लागली.

## आधुनिक अस्थिर जीवनांतील एकाकीपणा

परंतु या प्रश्नाची दुसरीहि बाजू आपण विचारांत घेतली पाहिजे. मध्ययुगीन चौकटींतून मुक्त होऊन माणसानें स्वातंत्र्य मिळविलें खरें परंतु तें केवळ नव्या धन्याची गुलामगिरी पत्करण्यासाठींच ! कधींकधीं गुलामगिरींतील लाचारीचें—मानहानीचें दुःख सहन करण्यापेक्षां स्वातंत्र्यांतील जबाबदारी पेलणें जास्त कठीण होऊन बसतें. आधुनिक समाजव्यवस्थेंत विज्ञान कोणतें कार्य करीत आहे, हें समजावून घेण्यासाठीं व्यक्ति-स्वातंत्र्य आणि सामाजिक प्रगति यांचें द्वंद्वात्मक विरोध-विकासवादी स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे.

विज्ञानानें व्यक्तीची आध्यात्मिक, आर्थिक आणि राजकीय पाशांतून मुक्तता केली हें खरें. परंतु त्याजबरोबर हेंहि सत्य आहे कीं प्रचंड, अचाट शक्तीं-कडून इतस्ततः भिरकविल्या जाणाऱ्या एखाद्या अणू-प्रमाणें व्यक्तीची अनुकंपनीय अवस्था विज्ञानानें करून टाकली आहे. मध्ययुगीन समाजव्यवस्थेनें मानवाचें स्वातंत्र्य मर्यादित केलें असलें तरी त्याचबरोबर त्या मध्य-युगीन समाजानें त्या व्यवस्थेंतहि त्याला जन्मापासून मरे-पर्यंत सुरक्षित आणि निश्चित असें सामाजिक स्थानहि दिलें होतें. आपल्या सामाजिक दर्जाप्रमाणें तो जोंपर्यंत आपलीं कर्तव्यें पार पाडीत होता तोपर्यंत त्याच्या सर्व हक्कांचीहि समाजानें त्याला हमी दिली होती. आपल्या सदसद्विवेकबुद्धीप्रमाणें परमेश्वराची उपासना करण्याचें स्वातंत्र्य आजच्या मानवाला आहे, हें खरें. परंतु त्याचबरोबर हेंहि खरें कीं, कोणा गुरूच्या वा गुरु-बंधूच्या मार्गदर्शनाच्या अभावीं आज त्याला एकट्यालाच त्या परमेश्वरी शक्तीला तोंड द्यावें लागत आहे ! आर्थिक दृष्ट्या विचार केला, तर आजचा मनुष्य धूर्तता, चतुराई, कर्तृत्व, साहसप्रियता इत्यादि गुणांच्या जोरावर लाखों रुपये कमावूं शकतो हें खरें. पण तो जर या कामीं फसला तर त्याचा बोल केवळ त्याच्याच माथीं येतो. राजकीय क्षेत्रांत आज-च्या माणसाला मतदानाचा हक्क असला आणि त्यामुळें एकापरीनें आपल्या राजकीय भवितव्याचा तो शिल्प-कारहि मानला जात असला तरी दुसऱ्या परीनें प्रचंड पक्षसंघटना आणि प्रचारयंत्रणा यांच्या भाराखालीं त्याचें सारें व्यक्तिमत्त्व चिरडलें जात असतें. आजच्या स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य उपभोगायला मिळालें असेल. परंतु त्यामुळें विकल आणि विफल झालेल्या मानवाचा शेवटचा आसरा जें घर किंवा कुटुंब तेंच या आर्थिक स्वातंत्र्यानें उध्वस्त करून टाकलें आहे. त्यामुळें कुटुंबसंस्था विदीर्ण झाली असून मुलाबाळांची आबाळ होत आहे. आधु-निक मनुष्य स्वतंत्र्य झाला आहे याचा अर्थ, तो नैतिकदृष्ट्या एकाकी बनला आहे, असा होऊं पहात आहे.

आपल्या या आधुनिक समाजव्यवस्थेचें प्रमुख लक्षण गणल्या गेलेल्या या घटनेला रोपके या विचारवं-तानें 'आध्यात्मिक समुदायीकरण' ( 'Spiritual










Collectivisation ') असें म्हटलें आहे. तो आपल्या ' The Social Crisis of Our Time ' या ग्रंथांत म्हणतोः " गेल्या शंभर वर्षांत समाजाची घडी विस्कटली असून समाज म्हणजे निरनिराळया एकाकी, अलगअलग व्यक्तींचा एक विस्कळित समुदाय बनला आहे. सामाजिक कर्तव्यें करण्याच्या बाबतींत मात्र या व्यक्ती कीडमुंग्यांप्रमाणें एकत्र बांधल्या गेल्या असून बंदिस्त केल्या गेल्या आहेत. एका प्रचंड नगररूपी मुंग्यांच्या वारुळांत चढाओढ करणाऱ्या मुंग्यांची जशी सारखी प्रचंड रीघ लागावी त्याप्रमाणें समाज म्हणजे एक विराट् वारूळच बनलें आहे." याला माणसांचा समाज म्हणणें कठिण आहे. त्यांत मानवी संबंधांतून निर्माण होणारी प्रेमाची ऊब नाहीं. सर्वांना एकत्र गुंफणाऱ्या मानवी भावना, समान हेतू अगर कृती दिसत नाहींत. धर्माचा आसरा, जात आणि छोटे उद्योगधंदे यांमुळें मिळणारा परस्परांचा बंधुभावाचा आधार नष्ट झाला आहे. त्यामुळें माणसें आज त्या नष्ट मध्ययुगीन जीवनमूल्यांसाठीं वेड्या आशेनें आसुसलेलीं आहेत; नष्ट झालेल्या त्या रम्य भूतकाळांतील परंपरागत सातत्य, सुरक्षितता, निश्चितता इत्यादि गोष्टींचें भावडें आकर्षण माणसांना वाटत आहे.

आजच्या आधुनिक विचारविश्वावर देखील वरील गोंधळाचा व विस्कळितपणाचा परिणाम झालेला दिसून येतो. मध्ययुगीन जीवनांत एक मूलभूत एकसूत्रीपणा होता. त्यामुळें त्यावेळच्या विचारविश्वांतहि एकसूत्रीपणा होता. त्या वेळच्या आर्थिक व राजकीय घटना यांचा परस्परांमधील संबंध, त्या घटनांचा धर्म, कला, नीतिकल्पना यांच्याशीं संबंध— हीं सर्व लक्षांत घेतल्याशिवाय त्या आर्थिक व राजकीय घटनांचा अर्थ समजणें शक्य नव्हतें. त्या वेळीं एखाद्या गोष्टीचें ज्ञान मिळविण्याचा एकमेव मार्ग म्हणजे सर्वच सामाजिक प्रक्रियेच्या बहुविध अंगांशीं व बाजूंशीं ती गोष्ट कशी निगडित आहे, हें समजून घेणें हा होता.

### शास्त्रज्ञांपुढील पेच

पण हा मध्ययुगीन एकसूत्रीपणा वा एकसंधपणा वैज्ञानिक युगांत नाहींसा झाला. नव्या मनूंतील विचारवंतांनीं नव्या जीवनपद्धतीशीं तावडतोब जुळवून घेतलें. निरनिराळया विज्ञानशाखा स्वतंत्रपणें वाढीला लागल्या. विचारविश्व निरनिराळया 'पाणीबंद' कप्प्यामध्यें विभागलें गेलें. शुद्ध (pure) अर्थशास्त्र, शुद्ध मानसशास्त्र, शुद्ध नीतिशास्त्र, शुद्ध राज्यशास्त्र इत्यादि शुद्ध शास्त्रें स्वतंत्रपणें वाढूं लागलीं. विज्ञानाच्या प्रत्येक शाखेमध्यें त्या एकमेव शाखेंतील समग्र ज्ञानसंपादना-(Specialization ) च्या प्रक्रियेमुळें त्या त्या शास्त्राची प्रत्येकीं निःसंशयपणें झपाट्यानें प्रगति झाली खरी. परंतु या प्रगतीसाठीं आपणास जबर किंमतहि द्यावी लागली आहे, हेंहि तितकेंच खरें ! प्रत्येक विज्ञानशाखेंतील विशारदांचा गट आपल्या शाखेंतील ज्ञानसंपादनांत इतका मग्न होऊन गेला आहे कीं, आपली विज्ञानशाखा ही दुसऱ्या विज्ञानशाखेपासून भिन्न कशी आहे, कोणत्याहि दोन विज्ञानशाखांतील क्षेत्रें बरोबर कोठें विभक्त होऊं लागतात हें लक्षांत घेण्यास आज कोणीहि तयार नाहीं. ज्ञानाच्या क्षेत्रांत जणूं ही 'तज्ज्ञांची बजबजपुरी' ( ' No scholar's land ' ) माजली आहे !

याचा परिणाम मात्र असा झाला आहे कीं, जीवनांतील निकडीच्या जिव्हाळयाच्या प्रश्नांपासून या तज्ज्ञांच्या विज्ञानशाखांचा संबंध तुटला असून त्या एकमेकांपासून अधिकाधिक दुरावतच आहेत. विचारसृष्टीमध्यें आणीबाणीची स्थिति आज निर्माण होण्याचें हें एक प्रमुख कारण आहे. आज शास्त्रज्ञांपुढें मोठा पेंच उभा राहिला आहे : आपल्या संशोधनामुळें युद्ध आणि त्यामुळें संस्कृतिविध्वंस होणार हें भविष्य दिसत असतांना देखील आपलें संशोधनकार्य चालूं ठेवावें काय ? अर्थशास्त्रज्ञांच्या उपाययोजना राजकीयदृष्ट्या व्यवहार्य आहेत काय ? एकादी गोष्ट राजकीयदृष्ट्या सोयीची असेल, पण ती नैतिकदृष्ट्या बरोबर आहे काय ? – या प्रश्नांचीं उत्तरें देऊन या शृंगापत्तींतून सोडवील असा कोणीच दिसत नाहीं !

विज्ञानाचे अत्यंत घातक परिणाम जर कोठें दिसत असतील तर ते समाजशास्त्रांच्या क्षेत्रांत होत. मॅक्स शेलर ( Max Scheler ) यांनीं, भौतिक शास्त्रांचें (उपयुक्त) ज्ञान, ज्ञानाकरितां ज्ञान, आणि आध्यात्मिक समाधानाकरितां ज्ञान, असे ज्ञानाचे तीन प्रकार कल्पिले आहेत. यांपैकीं पहिल्या प्रकारचें भौतिक शास्त्रांचें उपयुक्त ज्ञान हें प्रभुत्व, सत्ता, किंवा कृती यासाठीं असतें. हें ज्ञान मुख्यतः साधनभूत आहे. त्यामुळें नव्या मूल्यांचा शोध लागण्याची शक्यता







नसते. परंतु अस्तित्वांत असलेलीं मूल्यें चांगल्या प्रकारें आणि अधिकांशानें साकार करण्यासाठीं मात्र भौतिक शास्त्राचा निश्चित उपयोग होतो. भौतिक निसर्गाचें ज्ञान करून घेऊन त्याचें नियंत्रण करण्याच्या कामीं हें ज्ञान पुष्कळच यशस्वी ठरलें आहे.

परंतु " हें सर्व ज्ञान तरी कशासाठीं ? " " Knowledge for What ? " या आव्हानात्मक प्रश्नास मात्र उत्तर मिळूं शकत नाहीं. निसर्गावर ताबा मिळविण्याच्या उद्देशानें भौतिकशास्त्रीय-ज्ञान-संपादनाच्या कामामध्यें गेलीं कांहीं शतकें पाश्चात्त्य माणूस इतका गढून गेला आहे कीं त्यामुळें आध्यात्मिक अनुभूति घेण्याची त्याची शक्तिच जणूं नष्ट झाली आहे. आधुनिक पाश्चात्त्य संस्कृतीची ही दुःखान्तिका रवींद्रनाथ टागोर यांनीं जिराफच्या प्रतीकाच्या साहाय्यानें चांगल्या प्रकारें व्यक्त केली आहे.

## नव्या समन्वयाची आवश्यकता

भौतिक विज्ञानानें मिळविलेलें अद्भुत यश आणि तज्जन्य प्रतिष्ठा ही डोळयांत भरल्यामुळें समाजशास्त्रांना देखील भौतिक शास्त्रांच्या पद्धती यांत्रिकपणें व अंधपणें लागूं करण्यांत आल्या आणि त्यामुळें साहजिकच त्याचे परिणाम भयावह झाले. समाजशास्त्रीय प्रश्नांच्या अभ्यासाना देखील निसर्गशास्त्राच्या अभ्यासाची पद्धति आंधळेपणानें लागू करण्याच्या या मार्गाला हायेक (Hayek) या विचारवंतानें 'सायंटिझम्' ( 'यांत्रिक विज्ञानवाद' ) असें म्हटलें आहे. शास्त्र प्रथमावस्थेंत असतांना त्याला देखील निसर्गातील घटनांवर व दृश्यांवर मानवाचा अध्यारोप करणाऱ्या भोळसट (anthropomorphic) कल्पनाशीं दोन हात करावे लागले. लोकांना अमक्या घटनेबद्दल काय वाटतें याचा विचार न करतां, स्वतंत्रपणें निरनिराळया घटनांचा वस्तुनिष्ठ अभ्यास करूनच भौतिकशास्त्रांची प्रगति झाली. परंतु निसर्गशास्त्रांच्या या अभ्यासपद्धतीचें अंधानुकरण समाजशास्त्राच्या क्षेत्रांत झालें. वस्तुस्थितीमागील आशय आणि मूल्य हीं बाजूला टाकून वस्तुस्थितीचा अभ्यास सुरूं झाला. निसर्गशास्त्रज्ञाप्रमाणें कांहीं समाजशास्त्रज्ञ देखील खरीं मूल्यें डावलून साधनांनाच अवास्तव महत्त्व देऊं लागले आहेत. मानवी मन आणि बुद्धि यांची योजनाबद्ध वाढ करण्याच्या हेतूनें मानवी व्यवहार नियंत्रित करण्यासाठीं निरनिराळया भपकेबाज योजना आंखल्या जाऊं लागल्या आहेत. सर्व समाजाचें नियंत्रण करून, नुकतेच मध्ययुगीन बंधनांतून मुक्त होऊन सैरावैरा भटकणाऱ्या मानवी मनाला पुन्हा शृंखलाबद्ध करण्याच्या तंत्रांतील अगदीं अलिकडील प्रयत्न म्हणजे फॅसिस्ट सर्वाधिकारशाहीचें उदाहरण होय.

आजचें विजिगीषु विज्ञान आणि त्याच्या पद्धती यांनीं आजच्या मानवाची अशी ही विपन्नावस्था झाली आहे! वैज्ञानिक शोधांचा वापर करीत असतांना, सर्व प्रयत्नांचें अंतिम मूल्य मानव किती स्वतंत्र व सुखी झाला आहे यांतच आहे. हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. ही कसोटी जर आपण लक्षांत ठेवली व विज्ञानानें पालटलेल्या आजच्या भौतिक परिस्थितीनुसार आपण आपल्या विचाराच्या संवयी जर बदलून टाकल्या तर आपणास हताश होण्याचें कारण नाहीं. मध्ययुगीन जीवनामध्यें एकसंधीपणा किंवा एकसूत्रीपणा होता पण तो वरून लादलेला होता. समाजहितासाठीं माणसाचें व्यक्तिमत्त्व दडपून टाकून तो एकसंधीपणा साधला होता. पण आपल्या आजच्या समाजावर ओढवलेल्या संकटांतून आपण निभावून जावें म्हणून मध्ययुगीन बंधनांतून मुक्त झालेला आजचा मानव पुन्हा आपलें स्वातंत्र्य गमवायला व स्वतःचें व्यक्तित्व दडपूं द्यायला तयार होईल अशी आशा करणें वेडेपणाचें होईल. फॅसिझम्नें तशा प्रकारचा प्रतिगामी प्रयोग करून पाहिला आणि लज्जास्पद अपयश त्याच्या पदरीं आलें.

व्यक्ति आणि समाज यांना एकत्र गुंफून त्यांचा एक नवा समन्वय साधावा अशी आपली इच्छा आहे. विज्ञानानें आज अशी भौतिक परिस्थिति निर्माण केली आहे कीं जींत अशा प्रकारें व्यक्तिहित व समाजहित यांचा नवा समन्वय वा समतोल साधून व्यक्तिजीवनाच्या साफल्यांतच समाजजीवनाचेंहि साफल्य होऊं शकेल.

विज्ञानानें स्थलकालांवर विजय मिळविला असून भिन्न भिन्न देशांचें एक जग बनविलें आहे. प्रत्येक राष्ट्र तुलनात्मक दृष्टया स्वतंत्र व सार्वभौम आहे, हें खरें आहे. परंतु आजचीं राष्ट्रें हीं परस्परावलंबी आहेत हेंहि आपणास नाकारून चालणार नाहीं. शांतता आणि भरभराट ह्या अविभाज्य आहेत हें आतां सर्वांना अधिकाधिक पटूं लागलें








आहे. जगाच्या पाठीवर कुठेंहि दारिद्र्य वा तंग परिस्थिति असेल तर त्यामुळें सर्व जगाला धोका निर्माण होतो. कच्च्या मालासाठीं जी आज भयंकर अहमहमिका चालली आहे ती पाहिली म्हणजे या कच्च्या मालाचीं सर्व केंद्रें जगांतील मध्यवर्ती सत्तेच्या हातीं देऊन साधनसंपत्तीच्या बाबतींत साम्यवाद स्थापित करण्याची गरज भासते. अप्रगत राज्यांच्या विकासासाठीं ज्या बहुविध योजना आंखल्या जात आहेत त्या ह्याचेंच गमक होय.

व्यक्तिहित व समाजहित यांच्या समन्वयाचें उद्दिष्ट साधण्यासाठीं आपणास दोन गोष्टी करणें आवश्यक आहे. एक तर आपण आपल्या जुन्या विचारांची चाकोरी बदलली पाहिजे. आणि दुसरें म्हणजे या परस्परावलंबी जगांत राहणाऱ्या व्यक्तींच्या नव्या वर्तनक्रमाशीं जुळतील अशा संस्था निर्माण केल्या पाहिजेत. मॅनव्हाइमनें[1] मानवी विचाराचे तीन टप्पे कल्पिले आहेत : (१) अकल्पितपणें लागलेले शोध. (२) परिश्रमपूर्वक केलेलें नवें संशोधन (invention). (३) योजनात्मक विचारपद्धति (planned thinking). आपल्याला दुसऱ्या टप्प्यावरून तिसऱ्या टप्प्याकडे जावयाचें आहे.

परस्परसंबद्ध साकल्यानें जो विचार व्हावयास पाहिजे त्या विचारांचा अभाव हेंच आज आपणांसमोर 'आ' वासून उभ्या असलेल्या अनेक प्रश्नांचें मूळ कारण आहे. एकोणिसाव्या शतकांत असें आपण मानीत होतों कीं मतदानपद्धतीनें आपले सर्व राजकीय प्रश्न सुटतील. परंतु त्यामुळें राज्ययंत्रणा ही उद्योगपतींच्या खाजगी मालकी हक्काची बाब ठरली हें आपण आज पहात आहोंत. तंत्रविद्येंतील प्रगतीमुळें आज आध्यात्मिक आणि नैतिक जाणीव किती बधिर झाली आहे, हें सर्वश्रुतच आहे. एक प्रश्न सुटला तर त्या जागीं अनेक नवे प्रश्न निर्माण होतात. परस्परसंबद्ध साकल्यानें विचार करण्यामागील हेतु हाच कीं त्यामुळें विविध अंगांनीं युक्त असलेल्या समाजाचा सर्वांगीण अभ्यास आपण करावा आणि एखाद्या क्षेत्रांमध्यें वैयक्तिक कृतींच्या केवळ तात्कालिक परिणामांवरच लक्ष केंद्रित न करतां सर्व समाजावरच त्या वैयक्तिक कृतींचें कोणते दूरगामी परिणाम होतात याचाहि सर्वांगीण विचार करून आपली तयारी ठेवावी.

लोकांचा नवीन वर्तनक्रम लक्षांत घेऊन त्याच्याशीं जुळणाऱ्या व त्याला योग्य वळण देणाऱ्या संस्था निर्माण करणें अत्यंत महत्त्वाचें आहे. उदारमतवादी तत्त्वज्ञान हें आजच्या विज्ञाननिष्ठ युगाचें एक प्रमुख लक्षण आहे. त्या तत्त्वज्ञानानें कांहीं मध्ययुगीन संस्था नामशेष केल्या खऱ्या. परंतु त्या जागीं नव्यांची मात्र निर्मिति त्या तत्त्वज्ञानानें केली नाहीं. कुटुंब, जात अगर छोटे महाजनसंघ यांचीं कामें जेव्हां राज्यसंस्था आपल्या शिरावर घेते, तेव्हां तिनें लोकांचा नवा वर्तनक्रम सामावून घेणाऱ्या नवीन संघटना निर्माण करून त्यांच्या द्वारें जनता आणि राज्यसंस्था यांना जोडणारा एक सांधा निर्माण केला पाहिजे. जाति, कुटुंब अगर राष्ट्रवाद यांवरील निष्ठा या समाजविरोधी आहेत असें म्हणून त्यांचा नुसता धिक्कार करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. एका राष्ट्रांतील निरनिराळया लोकांमध्यें जसे परस्परसंबंध प्रस्थापित होऊन संवादित्व निर्माण होतें, त्याचप्रमाणें वेगवेगळया राष्ट्रांतील लोकांमध्यें यथायोग्य परस्परपूरक संबंध व एकता कशीं निर्माण करावयाची हाच खरा प्रश्न आहे. राष्ट्रनिष्ठेच्या

---

१ मॅनहाइमच्या शब्दांत, हा विचार असा आहे : We have now to make the transition from the second stage to the third, "from the deliberate invention of single objects or institutions to the deliberate regulation and intelligent mastery of the relationships between objects.... At the second stage, the pattern of thought is a linear one. It takes the form of a circular flow where the first elements in the causal chain are, in our new model of thought, supplemented by further elements, the movement of which tends towards an equilibrium, and in which all the factors act upon each other simultaneously, instead of in an endless succession."

—'**Man and Society**' (Kegan Paul – London 1940)





अनुक्रमणिका

पलीकडे जाऊन राष्ट्रातीत एकता व परस्परावलंबी जागतिक ऐक्य निर्माण करण्याचा हाच एक मार्ग होय.

### खऱ्या विवेकशील व्यक्तींचें सहकार्य

नव्या समाजव्यवस्थेंत स्पर्धाप्रधान भांडवलशाही अर्थव्यवस्थेला स्थान नाहीं हें उघड आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थेनें युक्त अशा समाजामध्यें व्यक्तीची इच्छाशक्ति स्वतंत्र असते असें म्हटलें जातें. याचें कारण, लाखों लोकांच्या इच्छाशक्ती स्वतंत्रपणें कार्य करीत असतांना त्या सर्वांचा एकूण परिणाम काय असतो याची त्या व्यक्तीला जाणीव नसते. भांडवलशाही बाजारपेठेमध्यें 'मागणी आणि पुरवठा' यांचे संबंध काय आहेत हें शेतकऱ्याला कळत नसतें. म्हणून त्याला जें वाटेल त्याचें उत्पादन करण्याला तो 'स्वतंत्र' असतो. आपणांला संपूर्ण ज्ञान आहे हें गृहीत धरल्यावर, निवड करण्याचें स्वातंत्र्य हा एक केवळ आभास आहे. १९१८ सालीं आपण जे निर्णय घेतले, त्याचे आज होणारे परिणाम जर आपल्याला त्याचवेळीं कळले असते तर आपण तसेच निर्णय घेतले असते कां, हा प्रश्न आपण स्वतःलाच विचारून त्याचें उत्तर शोधणें मनोरंजक होईल. व्यक्तिप्रधान अर्थव्यवस्थेंत प्रत्येक व्यक्ति स्वतःच्या कामापुरती विवेकशील असते; आपला स्वतःचाच हेतु चांगल्या प्रकारें कसा साध्य करून घेतां येईल हें समजावून घेण्यापुरताच सर्व सामाजिक प्रक्रियेचा विचार ती करीत असते. आपलीं आणि इतरांची कर्तव्यें यांच्यामध्यें संघर्ष न येऊं देतां तीं परस्परांशीं संवादी व पूरक ठरून सर्व समाजाचा व्यवहार सुरळित कसा चालेल याचें व्यक्तीला ज्ञान नसतें. "व्यक्ति आपल्या कामापुरती वरवर विवेकशील असते. ती 'समग्र' अर्थानें विवेकशील नसते."[२] याऐवजीं परस्परावलंबी विचार आणि कृति यांची आवश्यकता व महती माणसांना जर पटली तर माणसें आपला भावी इतिहास हेतुपूर्वक घडवूं शकतील.

जातिव्यवस्था किंवा छोटे महाजनसंघ यांतील यांत्रिक जडता न येऊं देतां, एकसंधी व्यवसायानुसारी (functional) अशी नवसमाजरचना आपणास करायची आहे. त्याचप्रमाणें माणसाचें व्यक्तिमत्त्व दडपून टाकणारा धर्माचा मध्ययुगीन आधार काढून टाकून त्या ठिकाणीं 'खऱ्याखुऱ्या विवेकशील' ('Substantially rational') मानांवच्या सहकार्याची प्रस्थापना करायची आहे. सामान्य माणसाची बुद्धि विकसित होऊन त्याच्या दूरदृष्टीचें क्षितिज वाढणें यावरच आपली भिस्त आहे. सहकार्याधिष्ठित प्रयत्नाच्या नव्या संवयी निर्माण करण्याच्या कामीं आपण यशस्वी ठरलों तरच व्यक्तीची नैतिक एकाकीपणाच्या चिंतेपासून मुक्तता होईल, आणि व्यक्तीला नवीन बंधुभावनेच्या अंतरंगांतून स्रवणाऱ्या स्वातंत्र्यभावनेंतील रसाचा आस्वाद घेतां येईल. या दुसऱ्या 'नवजीवना'-(Renaissance) मध्यें 'भाकरी'चें प्रचलित अवास्तव महत्त्व नाहींसें होईल आणि स्वातंत्र्याला खऱ्या आत्माविष्काराचा अर्थ प्राप्त होईल.

---

### खेळ !

शांत जाहलें भवतीं सारें
आलें अंधारुनी
कृष्ण गहन या वनीं मला मग
हाक मारिली कुणी ?
— क्षितिजावर ती चमचमणारी
असेल ती चांदणी !

एकटीच मी आज चाललें
भयाण मार्गहि सारा
स्नेह-हीन अनिकेतन मजला
केला कुणी इषारा ?
— असेल अस्फुट दूरामधला
उन्मन गूढ किनारा !

कोणाची ही लाडिक कुजबुज ?
असेल का हा वारा ?
पैंजण पायीं, गीत कुणाचें ?
नव्हेच ती जल-धारा !
— ओळखिलें मी तुजला पुरतें
खेळ तुझा हा सारा !

— प्रद्युम्न टंकसाली

२ "An individual is functionally rational. He is not substantially rational"—'Man & Society', Mannheim p. 123.








प्रा. सुरेश म. डोळके

# ' विवेकसिंधू 'चा कालनिर्णय : १ :

मुकुंदराजांच्या स्थलाप्रमाणेंच मुकुंदराजःच्या कालासंबंधींहि विद्वानांत अनेक मतभेद आहेत. ' मुकुंदराजांचा स्थलनिर्णय ' या नांवाची एक लेखमाला मी ' महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकें 'त लिहिली. मुकुंदराजांनीं

' वैण्येगंगेचा तीरी । मणोहर अंब्राणगरी
तेथ प्रगटले श्रीहरी । जगदीश्वरू ॥ '
वि. सिं. ( उत्तरार्ध, ) ११–३७

या ओवींत उल्लेखिलेलें तीर हें मराठवाड्यांतील बाणगंगेचें नसून नागपूर – भंडाऱ्याची सीमारेषा असलेल्या वैनगंगेचें होय व ' मणोहर अंब्राणगरी ' ही आंबेजोगाई नसून ' अंभोर ' होय असें मीं सप्रमाण दाखविलें आहे.[१] प्रस्तुत लेखांत ' विवेकसिंधू 'तील कालनिदर्शक उल्लेखावरून ' विवेकसिंधू 'चा व त्याच्या अनुषंगानें मुकुंदराजांचा कालनिर्णय करावयाचा आहे.

ज्या उल्लेखावरून मुकुंदराजांच्या कालासंबंधीं विद्वानांनीं अनुमानें काढलीं आहेत, तो 'विवेकसिंधू '-तील उल्लेख असा —

' शके अकराशत दाहोत्तरे । १११० । साधारन संवसत
राजा सारंगधरु । राज्य करि ॥
ऐसा समयो सर्वोत्तमु । तेथ मुकुंद द्विजोत्तमु
विवेकसिंधौ मनोरमु । निर्मीता जाला ॥ '
– वि. सिं. ( उत्त. ) अ. ११.

' विवेकसिंधू 'च्या सर्व प्रतींत प्रस्तुत उल्लेख आढळत नाहीं. 'विवेकसिंधू'चीं तीस हस्तलिखितें मला पहावयाला मिळालीं, पण त्यांपैकीं पांचच प्रतींत काय तो प्रस्तुत उल्लेख आढळला.[२] त्यामुळें या ओव्या प्रक्षिप्त असाव्या की काय अशी शंका येणें स्वाभाविक आहे.

शिवाय, मुकुंदराजांनीं स्वतःला ' द्विजोत्तमु ' व ' विवेकसिंधू 'ला ' मनोरमु ' म्हटलें यावरूनहि या ओव्या मुकुंदराजांच्या हातच्या नसाव्यात, असा त्यांवर आक्षेप येणें संभवनीय आहे.

## ओव्यांची विश्वसनीयता

' विवेकसिंधू 'च्या **गदारोळानें**[३] जैतपाळाला ब्रह्मसाक्षात्कार घडविल्यानंतर ( वि. सिं. ७–१५२ ) ' जैतपाळाचेणि **प्रसंगें** ' जग सुखी करणारा ( वि. सिं. ७–१५३ ) हा ग्रंथ स्वतःजवळ असावा असें अनेकांना व त्यांतहि जैतपाळाला ब्रह्मसाक्षात्कार घडविण्याच्या ईर्षेनें त्याच्याकडे गेलेल्या पण त्याच्या बंदिवासांत पडलेल्या व मुकुंदराजांनीं विवेकसिंधूच्या **गदारोळानें** मुक्त केलेल्या साधुसंतांना वाटणें स्वाभाविक होतें. तो सर्व **प्रसंग** त्यांना माहीत होता. त्यांच्यापैकींच एकाद्यानें ही कालनिदर्शक ओवी रचून स्वतःच्या प्रतीच्या शेवटीं घातली असेल व पुढल्या ओवींत मुकुंदराजांना ' द्विजोत्तमु ' व ' विवेकसिंधू 'ला ' मनोरमु ' म्हटलें असेल. म्हणजे या ओव्या स्वतः मुकुंदराजांच्या नसून मुकुंदराज व ' विवेकसिंधु ' यांची माहिती असलेल्या कुणातरी व्यक्तीनें स्वतःच्या ' विवेकसिंधू 'च्या प्रतीच्या शेवटीं त्यांचा अंतर्भाव केला असेल. अशा रीतीनें सुरुवातीलाच ' विवेकसिंधू 'च्या दोन प्रती तयार झाल्या. एक प्रस्तुत ओव्या असलेली व दुसरी, त्या ओव्या नसलेली. मूळ प्रतींत त्या ओव्या नसल्यामुळें बहुसंख्य प्रतींत त्या आढळत नाहींत. पण त्याबरोबरच, दुसऱ्याहि प्रतीचें हस्तान्तर व स्थलान्तर झाल्यामुळें कांहीं प्रतींत त्या आढळतात.

या विचारसरणीनुसार प्रस्तुत ओवी ' विवेकसिंधू 'च्या कालनिर्णयाबाबत प्रमाण मानावयाला यत्किंचित्‌हि हरकत नाहीं. या विचारसरणीचे प्रतिपादक ज्ञानेश्वरीच्या शेवटली ' शके बारा शतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंद बाबा आदरें । लेखक जाला ॥ ' ( ज्ञाने. १८,१७९२ ). ही ओवी उद्धृत करून विचारतीलः ही कालनिदर्शक ओवी ज्ञानदेवांच्या हातची नाहीं. सच्चिदानंदबाबांच्याहि ती हातची नाहीं असें राजवाड्यांचें म्हणणें.[४]

१. ' म. सा. पत्रिका ' : वर्ष २५, अंक १०५; १०६ व वर्ष २७, अं. १०८ [ जाने. फेब्रु. मार्च १९५४ ].

२ त्यांपैकीं एका प्रतींतून तो जसाच्या तसा वर उद्धृत केला आहे. '१११०' आंकडाहि मुळांत आहे.

३ ' गदारोळ ' या शब्दाचा मी केलेला अर्थ म. सा. पत्रिका, अं. १०८, पृ. १८ वर पहावा.

४ ज्ञानेश्वरी : प्रस्तावना, पृ. ६८.










तरी ती ओवी ज्ञानेश्वरीच्या कालनिर्णयाच्या बाबतींत आपण अविश्वसनीय मानतों का ? राजवाड्यांनींहि तशी ती मानलेली नाहीं. मग 'विवेकसिंधू'च्या बाबतींतच, प्रस्तुत ओवी स्वतः मुकुंदराजांच्या हातची नाहीं म्हणून, अविश्वसनीय कां मानण्यांत यावी ?

मला मात्र ही विचारसरणी प्रमाण मानावीशी वाटत नाहीं. या ओव्यांच्या अंतःस्वरूपाकडे पाहिलें व शारंगधर आणि जैतपाळ यांचा मुकुंदराजांशीं असलेला संबंध 'विवेकसिंधू'वरून ध्यानांत घेतला, तर या ओव्या मुकुंदराजांच्याच याविषयीं संशय रहात नाहीं.

१११० हें शक मुकुंदराजांनीं 'विवेकसिंधु' लिहिण्याचें आहे, ग्रंथरचनेचा 'गदारोळ' करून जैतपाळाला ब्रह्मसाक्षात्कार घडविण्याचें व त्या प्रसंगानें जग सुखी करण्याचें नव्हे. मुकुंदराजांनीं अंभोर येथें 'विवेकसिंधु' आधीं लिहिला व मग तो खेडला येथें जैतपाळाला सांगून त्याचा उद्धार केला.

कळमेश्वर येथील मठांत उपलब्ध झालेल्या मोडी कागदांतहि,

"पुढें हरिनाथ यानी व रघुनाथ यानी शके ११०८ मध्यें समाधि घेतली व नंतर शके १११० **मध्यें विवेकसिंधु शारंगधर राजा अंबनगरीस असतांना तयार** झाला व पुढें जयंतपाळ राजाचा उद्धार करून विवेकसिंधूचा बोध केला"

असें स्पष्ट म्हटलें आहे.

अंभोर येथें ग्रंथसमाप्ति झाल्याबरोबर त्याच्या शेवटीं लेखनकाल, लेखक व ग्रंथ यांचा निर्देश करणाऱ्या प्रस्तुत ओव्या मुकुंदराजांनींच लिहिल्या. जैतपाळाचा उद्धार करण्याला मुकुंदराज गेले नसते तरी या ओव्या 'विवेकसिंधू'त राहिल्या असत्या. त्यांचा व 'जैतपाळाचेनि प्रसंगें' जग सुखी करण्याचा कांहींहि संबंध नाहीं.

'विवेकसिंधु' लिहून पूर्ण केल्याबरोबर मुकुंदराज जैतपाळाला ब्रह्मसाक्षात्कार घडविण्याकरितां खेडला येथें गेले. व तेथें त्यांनीं पहिल्यांदा 'विवेकसिंधु' प्रगट केला. 'विवेकसिंधू'ची रचना कधीं आणि कुणाच्या राज्यांत झाली हें ती प्रगट करण्याआधीं इतरांना माहित असण्याचें कारण नव्हतें.

जैतपाळाचा उद्धार केल्यानंतर 'विवेकसिंधू'च्या नकला करणारांनीं जर प्रस्तुत ओव्या मुळांत समाविष्ट केल्या असत्या तर त्यांत जैतपाळाचा उल्लेख ओघानेंच आला असता. जैतपाळाचा प्रसंग इतका भव्य आणि दिव्य होता कीं त्या भव्यत्वानें आणि दिव्यत्वानें दिपून गेलेल्या प्रतकारानें प्रस्तुत ओव्या मुळांत समाविष्ट करतांना त्यांत जैतपाळाचा उल्लेख अवश्य केला असता. तसें न करता ज्या शारंगधराच्या राज्यांत 'विवेकसिंधु' लिहिला गेला त्याचा एकट्याचा उल्लेख करण्याचें त्याला काय कारण होतें ? – त्याच्या दृष्टीनें शारंगधराच्या राज्यापेक्षां जैतपाळाचा प्रसंग अधिक उल्लेखनीय होता.

आणि शिवाय, मुकुंदराजांनीं शारंगधराच्या 'राज्यां'त 'विवेकसिंधु' लिहिला हें स्वतः मुकुंदराजांनीं सांगितल्याशिवाय इतरांना कळलें असेल हें संभवनीय वाटत नाहीं. [ शारंगधर हा रामदेवराव यादवासारखा बलाढ्य राजा नव्हता कीं ज्याचा उल्लेख नंतरच्या प्रतकारांनीं मुद्दाम करावा. ] आणि मुकुंदराज हें स्वतः इतरांना कशाला सांगतील ? त्यांनीं तें आपल्या ग्रंथाच्या समाप्तिलेखांत आधींच लिहून ठेवलें होतें.

'द्विजोत्तमु' व 'मनोरमु' या विशेषणांसंबंधींहि उलगडा केला पाहिजे. मुकुंदराजांनीं स्वतःला 'द्विजोत्तमु' व 'विवेकसिंधू'ला 'मनोरमु' म्हटलें यावरून प्रस्तुत ओवी मुकुंदराजांची नव्हे असें मानता येत नाहीं. उलट, या विशेषणांवरून ती मुकुंदराजांचीच असें मानण्याला जास्त आधार आहे.

मुकुंदराजांनीं स्वतःबद्दल गौरवाचे उद्गार 'विवेकसिंधूं'त अनेकदां काढले आहेत. 'विवेकसिंधू'तल्या जवळ जवळ प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं मुकुंदराजांनीं स्वतःचा उल्लेख 'मुनि' मुकुंदराज असा केलेला आढळतो.[५] कांहीं अध्यायांच्या शेवटीं ते स्वतःला 'राजयोगी' म्हणवितात,[६] तर सोळाव्या अध्यायाच्या शेवटीं 'मुनि' आणि 'राजयोगी' या दोन्हीहि विशेषणांचा उपयोग

५ 'विवेकसिंधु' : १, ११२; २,१०५; ३,१०१; ५,११२; ६,११४; ९,७१; ११,६२; १३,६; १४,१०६.

६ 'विवेकसिंधु' : ७,१४५; १७,५१; १८,१५५.










करून त्यांनीं स्वतःला 'मुनि मुकुंदराजु राजयोगी' असें म्हटलें आहे ( १६-१२२ ). ' मुनि ' आणि ' राजयोगी ' यांच्या मानानें ' द्विजोत्तमु ' हें विशेषण कांहीं विशेष नाहीं.

हीच स्थिति 'मनोरमु' या विशेषणाचीहि आहे. ज्या मुकुंदराजांनीं ' विवेकसिंधू'संबंधीं

''विवेकसिंधूचीं शब्दरत्नें । कंठि धरिजेतिल प्रत्नें
तरी जनकाचेनि महिमानें । श्लाघ्यता होये ॥ '
( वि. सिं. ७-१५१. )

किंवा

'' ये ग्रंथीचें हेंचि चातुर्य । जें रोकडें स्वानुभवसौंदर्य
म्हणौन सेवितु मुनिवर्य । विवेकसिंधु हा ॥ ''
( वि. सिं. १८-१४९ )

यासारखे[७] प्रसन्न आत्मविश्वासाचे उद्गार काढले आहेत, त्यांनींच ' विवेकसिंधू'ला ' मनोरमु ' म्हणावें हें किती स्वाभाविक आहे ! ''रसिक मुद्रा ब्रोलिजैल । तरी ग्रंथ-विस्तार होईल.'' [८]हे मुकुंदराजांचे 'विवेकसिंधू'बद्दलचे उद्गारहि ' मनोरमू'च्या संदर्भात ध्यानांत घेण्यासारखे आहेत.

सारांश, ' द्विजोत्तमु ' व ' मनोरमु ' या विशेषणां-वरून ती ओवी मुकुंदराजांच्या हातची नव्हे असें म्हणण्यांत यत्किंचित्‌हि अर्थ नाहीं. उलट, असा आत्मगौरवाचा उल्लेख मुकुंदराजांनीं केला नसता तर मात्र ती ओवी मुकुंदराजांच्या हातची नसून कुणीतरी मागाहून मूळांत समाविष्ट केली असें म्हणण्याला जागा राहिली असती.

या ओव्या मुकुंदराजांच्या हातच्या आहेत, तर त्या ' विवेकसिंधू'च्या सर्व प्रतींत कां आढळत नाहींत ?—

याचें कारण वारकरी पंथाच्या प्रसारांत व त्याही-पेक्षां ज्ञानदेवांना मराठीच्या आद्यकवीच्या सिंहासनावर बसविण्याच्या पूर्वीपासून चालत आलेल्या हव्यासांत आहे असें मला वाटतें. महाराष्ट्रांत वारकरी पंथाला प्रगति आणि प्रतिष्ठा ज्ञानदेव-नामदेवांपासूनच प्राप्त झाली. मुकुंदराज व ज्ञानदेव यांच्या तत्त्वज्ञानांत फरक नाहीं. म्हणून ज्ञानेश्वरीच्या लोकप्रियतेच्या महापुरांतहि 'विवेकसिंधु' टिकाव धरूं शकला. त्याच्या प्रती होतच राहिल्या. पण तत्त्वज्ञानाच्या बाबतींत जरी महाराष्ट्रांतल्या या अत्यंत प्रभावी पंथानें ' विवेकसिंधु ' पदरांत पाडून घेतला, तरी तो ज्ञानेश्वरीच्या आधीं झाला हें ज्ञानदेवां-ना उपास्यदैवत मानणाऱ्या या पंथाला रुचणें शक्य नव्हतें. वारकरी पंथ आणि ज्ञानदेव यांच्या अभि-मानानें आंधळे झालेले अनेक विद्वान् आजहि महा-राष्ट्रांत आहेत. ज्ञानदेवांच्या कुठल्याहि क्षेत्रांतल्या आद्यत्वाला धक्का लागलेला त्यांना यत्किंचित्‌हि सहन होत नाहीं. ज्ञानदेवांच्या प्रभावानें व वारकरी संप्रदा-याच्या वैभवानें दिपून गेलेल्या तेव्हांच्या महाराष्ट्रां-तल्या सुशिक्षित समाजानें ' विवेकसिंधू'च्या प्रती केल्या खऱ्या. पण, मुकुंदराजांना आद्यत्व देण्याची इच्छा नसल्यामुळें प्रस्तुत ओव्या असलेला त्यांतला समाप्तिलेख मात्र त्यांनीं नेमका गाळला. त्यामुळें याच पोथ्या रूढ झाल्या व प्रस्तुत ओव्या असलेली एखादुसरीच प्रत आढळूं लागली.

' विवेकसिंधू'तील कालनिदर्शक ओवींतील शक–संवत्सरांचा मेळ जुळत नाहीं ही अडचण अलीकडील विद्वानांप्रमाणें पूर्वीच्या प्रतकारांच्याहि डोळयांपुढें उभी राहिली असेल आणि म्हणूनहि त्यांनीं प्रस्तुत समाप्तिलेख गाळला असेल.

मुकुंदराजांच्या परंपरेंतील मठांत आढळणाऱ्या व इतरत्र सांपडणाऱ्या ' विवेकसिंधू'च्या प्रतींतील फरकहि येथें लक्ष्यांत घेतला पाहिजे. मला ज्या पांच पोथ्यांत प्रस्तुत कालनिदर्शक ओवी आढळली, त्या पांचहि प्रती मुकुंदराजांच्या परंपरेंतील मठांतल्या आहेत. कै. भावे यांना भा. इ. सं. मंडळाच्या ग्रंथसंग्रहांतील ज्या पोथींत प्रस्तुत ओवी आढळली,[९] ती पोथीहि नागपूर येथील तांडा पेठेंतील मुकुंदराजांच्या परंपरेंतील गळघाटे यांच्या मठांतूनच भा. इ. सं. मंडळांत नेण्यांत आली असावी.[१०] कै. भिडे[११], कै. पांगारकर[१२]

७ ' विवेकसिंधु ' : ७,१५०; १८, १५३.
८ ' विवेकसिंधु ' : १८,१४८.
९ ' महाराष्ट्र-सारस्वत ', आ. २ री, पृ. २५.
१० यासंबंधींची माहिती गळघाटे यांच्या मठांतील लोक अजूनहि सांगतात.
११ म. भा. व वा. इतिहास, पृ. ७९, आ. १ ली.
१२ म. वा. इतिहास, खंड १ ला, पृ. ३९१, आ. १ ली.








प्रा. कृ. पां. कुलकर्णी[१३] प्रभृति संशोधकांनींहि प्रस्तुत ओवी कै. भावे यांच्या ग्रंथांतून म्हणजेच पर्यायानें मुकुंदराजांच्या परंपरेंतील मठांतल्या 'विवेकसिंधू'-वरूनच उद्‌धृत केली असावी असें वाटतें.

— महाराष्ट्रांतल्या इतर प्रांतापेक्षां विदर्भांत सांपडणाऱ्या 'विवेकसिंधू'च्या पोथ्यांतच प्रस्तुत ओव्या अधिक प्रमाणांत आढळाव्या ही घटनाहि किती उद्‌बोधक आणि सूचक आहे!

'विवेकसिंधू'च्या फार थोड्या प्रतींत कालनिदर्शक समासिलेख आढळत असला तरी तो खास मुकुंदराजांच्या हातचा आहे व म्हणून 'विवेकसिंधु' व मुकुंदराज यांच्या कालनिर्णयाच्या बाबतींत तो प्रमाण मानला पाहिजे हें वरील विवेचनावरून कळून येईल. डॉ. भाऊ दाजी, कै. जनार्दन बाळाजी मोडक,[१५] कै. भावे, कै. पांगारकर प्रभृति महाराष्ट्रांतल्या कांहीं विद्वानांनीं मुकुंदराज हे बाराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेले असें आपलें मत व्यक्त केलें आहे खरें. पण तें या ओव्यांच्या विश्वसनीयतेबद्दल मन साशंक ठेवून, आणि शके १११० मध्यें 'साधारण' संवत्सर येत नाहीं हें गृहीत धरून. त्यांपैकीं पहिल्या म्हणजे 'विवेकसिंधू'-तील कालनिदर्शक ओवींच्या विश्वसनीयतेच्या बाबतींत मी आपलें मत वर मांडलेंच आहे.

## मराठी पोथ्यांतील कालगणना

आतां प्रस्तुत उल्लेखांतील शक-संवत्सरांच्या प्रश्नाकडे वळावयाला हरकत नाहीं. कै. भावे, कै. पांगारकर, डॉ. तुळपुळे[१६] प्रभृति संशोधकांनीं शके १११० ला 'साधारण' संवत्सर येत नाहीं, 'कीलक' येतो असें आपलें मत व्यक्त केलें आहे.

कोठलाहि ग्रंथ लिहितांना तो केव्हां लिहिला गेला हें कळण्याकरितां तेव्हां प्रचलित असलेल्या कालगणनापद्धतीनुसार ग्रंथांत कालोल्लेख केलेला असतो. ती कालगणनापद्धति मृत झाली व प्रचलित कालगणनेशीं तिचा संबंध माहीत नसला तर त्या कालाचा आपल्याला बोध तरी होत नाहीं किंवा तो कालोल्लेख चुकीचा आहे असें तरी आपण म्हणतों. कनिष्कादिकांनीं आपल्या नाण्यांवर कोरलेल्या कालगणनेवरून किंवा पुराणांतील कृतत्रेतादियुगपद्धतीवरून कनिष्कादिकांच्या किंवा पुराणांत सांगितलेल्या कालांचा बोध आज आपल्याला होऊं शकत नाहीं याचें कारण हेंच आहे. गुप्तकाळ व चेदिकाळ यासंबंधींहि असेंच म्हणतां येईल.

कालगणनेच्या अनेक पद्धती अस्तित्वांत असल्या[१७] तरी मराठी मनाचा ओढा शालिवाहनशककालगणनापद्धतीकडेच अधिक आहे. 'विवेकसिंधू'तील कालोल्लेख व महानुभाव पोथ्यांतील कालगणना यांच्याकडे लक्ष दिलें तर ज्ञानदेव व रामदेवराव यादव यांच्याहि पूर्वीपासून ज्याला आज आपण शालिवाहनशक म्हणतों, त्या पद्धतीनुसारच कालगणना होत असे असें दिसून येतें. शिवाजीमहाराजांनीं राज्याभिषेकाच्या दिवसापासून म्हणजे गत शक १५९६, आनंद संवत्सर, ज्येष्ठ शुद्ध १३ या दिवसापासून स्वतःचा राजशक सुरू केला. पण दरबारांत जरी तो सुरू झाला तरी सामाजिक व धार्मिक व्यवहारांत शालिवाहनाच्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या शकाचेंच प्राबल्य कायम राहिलें. महाराष्ट्राच्या गेल्या ७५० वर्षांतील मराठी हस्तलिखितांत (बखरी, पत्रें, काव्यें इ.), शिलालेखांत व तांम्रपटांत शालिवाहनाच्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या शकाचाच उपयोग होत आला आहे.

शकाबरोबरच संवत्सराचाहि उल्लेख करण्यांत येतो. संवत्सर या शब्दाचा मूळ अर्थ वर्ष. पण वर्ष हा केवळ सामान्य अर्थ जाऊन त्याला प्रभवादि साठ वर्षांच्या चक्रांतील विशिष्ट वर्ष असा अर्थ प्राप्त झाला आहे. साठ वर्षांचें चक्र मानण्याचें कारण असें कीं गुरूला मध्यमगतीनें एक राशि क्रमण्यास सूर्यसिद्धान्ताप्रमाणें ३६१ दि. १ घ. ३६ पळें लागतात. या

१३ मराठी भाषा : उद्गम व विकास; 'अर्वाचीन मराठी' पृ. २६६.

१४ रॉयल एशिअटिक सोसायटीचें त्रैमासिक : खंड ९.

१५ महाराष्ट्र कविचरित्र : भा. १ ला (आजगांवकर); पृ. ४.

१६ 'यादवकालीन मराठी भाषा' पृ. ४; म. सा. पत्रिका, वर्ष २३, अं. ३, पृ. १९; म. सा. पुरवणी, पृ. ८४४.

१७ 'भारतीय ज्योतिःशास्त्र', दीक्षित, पृ. ३७३ ते ३७९.

१८ Travancore Archaelogical Series, Book I, p. 29.







काळालाच गुरूचा मास म्हणजे 'संवत्सर ' म्हणावयाचें. गुरूच्या पांच वर्षांचें एक युग कल्पिलें आहे. म्हणजे गुरूच्या एका युगांत सुमारें ६० वर्षें येतात. या साठ वर्षांनाच ' संवत्सरें ' म्हणतात व त्यांनाच प्रभव, विभव इ. नांवें आहेत.

### शक व संवत्सर यांचा परस्परसंबंध

शक व संवत्सर यांच्यांत नर्मदेच्या दक्षिणेला आज १२ वर्षांचा फरक आहे. प्रभवादि संवत्सरें मूळ बार्हस्पत्य मानावरून निघालीं. तरी सांप्रत नर्मदेच्या दक्षिणेला (Southern Cycle) संवत्सर बार्हस्पत्य मानाऐवजीं सौरमानाचें मानतात. बारा सौर वर्षांत बृहस्पतीचे अस्तोदय फक्त ११ च होत असल्यामुळें तेवढ्या अवधींत एका बार्हस्पत्य संवत्सराचा क्षय होतो. पण सांप्रत नर्मदेच्या दक्षिणेकडील संवत्सराचा बृहस्पतीच्या गतीशीं कांहींहि संबंध नसल्यामुळें त्यांत ' क्षय ' संवत्सराची भानगड नाहीं. म्हणून, कोणत्याहि शकाचें संवत्सर काढावयाचें असलें म्हणजे त्या शकाच्या गतवर्षांत १२ मिळवून बेरजेस साठानें भागावें लागतें.

ह्याशिवाय आणखी एक कारण वरील पद्धतीला दाखवितां येईल.

संवत्सर बार्हस्पत्य मानाऐवजीं सौरमानानें धरण्याविषयींच्या पद्धतीचा उल्लेख रोमशसिद्धान्त, ब्रह्मसिद्धान्त व भटोत्पलटीका यांत आढळतो.[१९] ' प्रमाथिप्रथमं वर्षं सौरं कल्पस्य सर्वदा ' ( ब्रह्मसिद्धान्त १,२७ )– "कल्पाचें पहिलें वर्ष सौर मानाने 'प्रमाथी ' असतें." 'प्रमाथी ' हें षष्टिसंवत्सरचक्रांतील १३ वें संवत्सर आहे. म्हणून, शकाच्या अंकांत नेहमीं १२ मिळवून संवत्सर निघतो.

नर्मदेच्या दक्षिणेला सध्या सौरसंवत्सराचीच कालगणनापद्धति रूढ आहे. या पद्धतीनुसारच दि. ब. पिल्ले यांनी इ. स ७०० ते १७९९ या कालांतील प्रत्येक शक – संवत्सराचें गणित करून ठेवलें आहे.[२०] कै. भावे यांनीं शकाचें साल दिलें असतां संवत्सर चटकन् काढतां यावा म्हणून जो ' अनंतपट ' तयार केला आहे, तोहि या पद्धतीनुसारच.

पिल्लेजंत्री व ' अनंतपट ' यांच्यानुसार शके १११० ( इ. स. ११८८ ) मध्यें ' कीलक ' संवत्सर येतो.[२१] ' साधारण ' येत नाहीं. भिडे – पांगारकरादि नंतरच्या मराठी वाङ्मयाच्या सर्व इतिहासकारांनीं त्यानुसार शके १११० त ' साधारण ' संवत्सर येत नाहीं असा एकमुखानें निर्णय दिला आहे.

गेल्या १२०० वर्षांतील शक-संवत्सरांचा मेळ जुळविण्याच्या बाबतींत मराठीचे सर्व अभ्यासक सामान्यतः पिल्लेजंत्रीवरच अवलंबून असतात. पिल्लेजंत्रीनुसार शक-संवत्सरांचा मेळ जुळला नाहीं तर पोथींतला मूळ लेखनशक चुकला व म्हणून त्या पोथींतील काल प्रमाण मानतां येत नाहीं असें मानण्याची अभ्यासकांची प्रवृत्ति दिसते. शके १११० त पिल्लेजंत्रीनुसार ' साधारण ' संवत्सर येत नाहीं म्हणून तो कालोल्लेख अविश्वसनीय असें मानण्याच्या मुळाशींहि हीच प्रवृत्ति प्रभावी आहे.

डॉ. कोलते यांनीं 'चक्रधरांचा कालनिर्णय ' करतांना जीं महानुभावीय हस्तलिखितें विचारांत घेतलीं, त्यांपैकीं पांच पोथ्यांतील शक – संवत्सरांचा मेळ पिल्ले जंत्रीनुसार जुळंत नाहीं व म्हणून ते ' शास्त्रीय ' दृष्टीनें ग्राह्य मानतां येत नाहीं असें त्यांनीं म्हटलें आहे. अशा शक – संवत्सरांचे मूळ पोथींतील उल्लेख, त्यांचा मेळ जुळत नाहीं म्हणून, त्यांनीं अनुपयोगी ठरविले आहेत.[२२]

पिल्ले-जंत्रीनुसार शक – संवत्सरांचा मेळ न जुळणारीं महानुभाव हस्तलिखितांतलीं आणखी कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.[२३]

---

१९ ' भारतीय ज्योतिःशास्त्र ' पृ. १८९.

२० ' An Indian Ephemeris by Swamikannu Pillai ( 1922 ) A. D. 700 to A. D. 1799.

२१ ' An Indian Ephemeris ', Vol. III, Page 379.

२२ ' श्रीचक्रधरचरित्र ' : वि. भि. कोलते, पृ. २९६.

२३ ' अन्वयस्थळ ' म. सा. पत्रिका ( वर्ष २९, अं० १०६ ).










[ शके ११८५ क्रोधनाम संवत्सरीं ... ' ]
[ शके ११८६ क्षए संवत्सरीं ... ' ]
[ शके ११८८ विभव संवत्सरीं ... ' ]
[ ११९० प्रमोद संवत्सरीं ... ' ]
[ शके ११९१ प्रजापति संवत्सरीं ... ' ]
[ शके ११९३ श्रीमुख संवत्सरीं ... ' ]

सीताबर्डी शिलालेखांत[२४] शके १००८, प्रभव संवत्सर असा उल्लेख आहे पण, डॉ. कीलहॉर्न यांनीं तो चुकीचा ठरविला आहे.[२५]

पिळ्ळे-जंत्रीनुसार वरील उदाहरणांतील शक - संवत्सरांचा मेळ जुळत नाहीं आणि तरीहि ते चुकीचे आहेत असें म्हणतां येणार नाहीं. उलट, हे कालोल्लेख शास्त्रीय दृष्टीनें अचूक आहेत व त्यांवरून शके १२०० पूर्वीच्या मराठी हस्तलिखितांतील कालगणनापद्धतीच्या एका प्रवाहावर चांगलाच प्रकाश पडतो असें मला वाटतें.

## ' संवत्सरें ' मूळ बार्हस्पत्य मानाचीं

प्रभवादि संवत्सरें मूळ बार्हस्पत्यमानावरून निघाल्याचा उल्लेख वर आलाच आहे. ' **बृहस्पतेर्मध्यमराशिभोगात्संवत्सरं सांहितिका वदन्ति** '[२६] म्हणजे मध्यमगतीनें गुरु एका राशींत जितके दिवस राहतो, तेवढ्या काळाला बार्हस्पत्य संवत्सर किंवा ' संवत्सर ' म्हणतात. ' गुरोर्मध्यमराशिभोगेन बार्हस्पत्यः '

बार्हस्पत्य संवत्सरांत ३६१ दि. २ घ. ५ पळें असतात. परंतु सूर्याची गति गुरूवर अधिक असल्यामुळें सौर वर्ष हें ३६५ दि. १५ घ. ३१ प. व ३० विपळांचें असतें.[२७] त्यामुळें ८५ सौरवर्षांत बार्हस्पत्य संवत्सरांचीं ८४ वर्षे होतात. म्हणजे बार्हस्पत्यमानानें सुमारें ८५ वर्षांत एका संवत्सराचा लोप किंवा क्षय होतो. ' क्षय ' संवत्सराची ही भानगडीची पद्धति नर्मदेच्या दक्षिणेला बंद होऊन तिच्याऐवजीं, म्हणजे बार्हस्पत्य गणनेऐवजीं, चांद्रसौरवर्षाची पद्धति तेथें सुरू झाली. चांद्रसौर पद्धतीचा गुरूशीं म्हणजे बार्हस्पत्यमानाशीं कांहींहि संबंध नाहीं. आणि म्हणूनच, वर ' शक आणि संवत्सर यांचा परस्पर संबंध ' या परिच्छेदांत सांगितलेल्या, किंवा —

' शकेन्द्र कालोऽर्कयुतः
कार्यः शून्यरसै ह्रतः ।
शेषाः संवत्सरो ज्ञेयः
प्रभवाद्यो बुधैः क्रमात् ॥

या श्लोकांत व्यक्त झालेल्या पद्धतीनुसार शकांत १२ मिळवून ( व ६० नें भागून शेष राहिलेल्या आंकड्यावरून ) त्याचा संवत्सर काढतां येतो. पिळ्ळे जंत्री व भावे यांचा ' अनंतपट ' सांप्रत नर्मदेच्या दक्षिणेला रूढ असलेल्या या चांद्रसौर पद्धतीवरच आधारलेला आहे.

प्रचलित पद्धतीपूर्वी नर्मदेच्या दक्षिणेला, नर्मदेच्या उत्तरेप्रमाणेंच, वास्तव बार्हस्पत्य कालगणनापद्धति चालू होती. बार्हस्पत्यमानानें सुमारें ८५ वर्षांत एका संवत्सराचा ' क्षय ' होत असल्यामुळें शकांत नेहमीं सारखाच आंकडा मिळवून बार्हस्पत्य संवत्सर निघत नाहीं. " शके ७४३ पूर्वी १२ हून कमी मिळवावयाचे असत. शके ७४३ पासून ८२७ पर्यंत[२८] १२ मिळवून संवत्सर निघे. दर ८५ वर्षांनी एकेक अंक वाढवायाचा. म्हणजे १३, १४ इत्यादि मिळवावयाचे. "[२९]

## कांहीं उदाहरणें

या पद्धतीनुसार शके ४८८ पर्यंतचा संवत्सर काढावयाचा असल्यास शकांत ८ मिळवावे लागतात.

' स्वस्तिश्रीनृपसूर्यसूनुजशके याते द्विवेदांबर - (३०४२)
त्रैर्मानाब्दमिते त्वनेहसि जये वर्षे वसंतादिके ।
चैत्रे श्वेतदले शुभे वसुतिथावादित्यदासादभूत्
वेदांगे निपुणो वराहमिहिरो विप्रो रवे राशिभिः ॥ '
— ' कुतूहलमंजरी '

या श्लोकांतील संवत्सर कोणत्याहि पद्धतीनें गणिताशीं मिळत नाहीं; यावरून हा श्लोक विश्वसनीय नाहीं

२४ Inscriptions in the C. P. & Berar. – Hiralal, Page 3.
२५ Epigraphia Indica, Vol. III, p. 304.
२६ ' निर्णयसिंधु ' ९.
२७ ' भारतीय ज्योतिःशास्त्र ', दीक्षित, पृ. १८९.
२८ Robert Sewell यांनींहि हा काळ श. ८२७ पर्यंतच मानला आहे. ' Indian Chronology ', Epigraphia Indica, Vol. 17, P. 156 व P. 340 वरील जंत्रीवरूनहि हेंच दिसून येईल.
२९ ' भारतीय ज्योतिःशास्त्र ' पृ. १८९.








असें भारतीय ज्योतिःशास्त्रकर्ते दीक्षित म्हणतात. [३०]

पण वरील पद्धतीनें यांतील शकसंवत्सरांचा मेळ जुळतो. तो [३१] असा : 'कुतूहलमंजरीं'तल्या माहितीनुसार वराहमिहिराचा जन्मशक [ ३०४२ - ३६ ( राशिभिः = ३ राशी = ३६ वर्षे ) - २५६६ ( 'ज्योतिर्विदाभरणां'तील कलिगतवर्षे ) = ] ४४० येतो. व बार्हस्पत्यगणनेनुसार शके ४४० ला [ ४४०+ ८ = ४४८ ÷ ६०. शेष = २८ = जय ] प्रस्तुत श्लोकांत सांगितलेला 'जय' संवत्सर येतो.

राष्ट्रकूट राजा गोविंद तिसरा याच्या एका ताम्रपटांत 'शक वर्ष ७२६, सुभानु संवत्सर, वैशाख मास, शुक्लपक्ष, पंचमी, बृहस्पतीवार ...' असा उल्लेख आहे. [३२] सांप्रतच्या दक्षिणेकडील पद्धतीप्रमाणें शके ७२६ त तारण संवत्सर येतो, सुभानु येत नाहीं.

पण, वर दिलेल्या पद्धतीनुसार मात्र शके ७२६ मध्यें [ ७२६ + ११ = ७३७ ÷ ६०. शेष १७= ] 'सुभानु' संवत्सर बरोबर येतो.

राष्ट्रकूटवंशीय कृष्ण पहिला याच्या तळेगांव ( ढमढेरे; जि. पुणें ) ताम्रपटांत 'शके ६९० प्लवंग संवत्सर ...' असा उल्लेख आहे. [३३]

वरील पद्धतीनें शके ६९० मध्यें [ ६९० + ११ = ७०१ ÷ ६०. शेष = ४१ = ] 'प्लवंग' संवत्सर येतो.

देवळी येथील ताम्रपटांत [३४] ( जि. वर्धा ) 'शके ८६२, शर्वरी संवत्सर, वैशाख कृष्ण ५ असा कालोल्लेख आहे. उत्तरेकडील कालगणनेप्रमाणें शके ८६२ ( गत ) मध्यें 'शर्वरी' संवत्सर येतो. [३५] ८६२ हें वर्तमानवर्ष धरून मेळ जुळत नाहीं. त्यानुसार शके ८६२ ( वर्तमान ) मध्यें [ ८६२ + १३ = ८७५ ÷ ६० शेष = ३५ = ] 'प्लव' संवत्सर येईल. पण, वैशाख कृ० ५ ही तिथि पूर्णिमान्त मानानें गत शक ८६२ मध्यें येत असल्यामुळें तेव्हां [ ८६१ + १३ = ८७४ ÷ ६०. शेष = ३४ = ] 'शर्वरी' संवत्सर बरोबर येतो.

सीताबर्डी शिलालेखाचीहि गोष्ट अशीच [३६] त्यांत शके १००८ 'प्रभव' संवत्सर "...' असा कालोल्लेख आहे. 'गतशक' लेखनाच्या पद्धतीनुसार शके १००८ ( गत ) मध्यें 'प्रभव' संवत्सर बरोबर येतो. १००८ हें वर्तमानवर्ष धरून मेळ बसत नाहीं. डॉ. कीलहॉर्न यांना या शिलालेखांतला कालोल्लेख बरोबर वाटत नाहीं. पण, वरील पद्धतीनुसार तो बरोबर असल्याचें आढळून येतें. [ १००७ + १४ = १०२१ ÷ ६०. शेष = १ = 'प्रभव' ].

मधुरान्तकदेवाच्या राजापूर ताम्रपटांत 'शके ९८७, पराभव संवत्सर, कार्तिक शुक्ल ...' असा उल्लेख आहे. [३८] उत्तरेकडील कालगणनेप्रमाणें शके ९८७ मध्यें ( गत ) 'पराभव' संवत्सर येतो.

वर दिलेल्या पद्धतीनुसारहि शके ९८७ ( गत ) मध्यें [ ९८६ + १४ = १००० ÷ ६०. शेष = ४० = ] 'पराभव' संवत्सर बरोबर येईल. [३९]

**'शके अकराशे दाहोत्तर। साधारण संवत्सरू -'**

या पद्धतीनुसार, शके १११० मध्यें 'बार्हस्पत्य' संवत्सर येण्याकरितां १११० त १६ मिळवावे लागतील. पण, शके १११० त १६ मिळवूनहि, बार्हस्पत्यगणनेनुसार 'साधारण' संवत्सर येत नाहीं, 'परिधावी' संवत्सर येतो.

शके १११० त 'साधारण' संवत्सर येण्याकरितां

३० 'भारतीय ज्योतिःशास्त्र', पृ. २१३ वरील तळटीप. ३१ डॉ. के. ल. दप्तरी.

३२ 'Indian Antiquary' Book II, P. 126.

३३ 'Indian Antiquary' Vol. XLII; January 1913; P. 27.

३४ राष्ट्रकूट राजा - कृष्ण तिसरा याचा ताम्रपट. Inscriptions in C. P. and Berar, P. 9. ३५ 'Epigraphia Indica' Vol. 17, P. 60.

३६ Sitabaldi Stone-Inscription of the time of Vikramaditya VI, Inscriptions in the C. P. and Berar, Hiralal, P. 3.

३७ 'Epigraphia Indica' Vol. III, Page 304.

३८ 'Inscriptions in the C. P. and Berar, Hiralal; P. 163.

३९ 'गतवर्ष आणि वर्तमानवर्ष' यांच्या बद्दलची माहिती 'भारतीय ज्योतिःशास्त्र', पृ. ३७१-३७२ यांत पहावी.










शकांत १४ मिळवावे लागतात. शके — १११० + १४ = ११२४ ÷ ६०. शेष ४४ = 'साधारण' संवत्सर. 'क्षय' संवत्सराच्या पद्धतीनुसार १११० त १६ मिळवावे लागतात. पण तरीहि १११० मध्यें १६ न मिळवतां १४ मिळविण्याची उपपत्ति माझ्या मतें पुढीलप्रमाणें आहे :

शके ७४३ पासून ८२७ पयत १२ मिळवून संवत्सर ७४३ पूर्वी दर ८५ वर्षांनीं एकेक अंक कमी करावयाचा. व ७४३ नंतर दर ८५ वर्षांनीं एकेक अंक वाढवावया. ( या दोन्हीहि प्रकारचीं उदाहरणें वर दिलीं आहेत. ) [४१]

१४ मिळवतां येईपर्यंत [ श. ८२७ ला दोन्ही पद्धतीप्रमाणें 'रक्ताक्ष' संवत्सर आहे असें मानलें तर ( ८२८ + ८५ = ९१३ ) शके ९१२ पर्यंतचें संवत्सर काढावयाचें असल्यास शकाच्या संख्येंत १३ मिळवावे लागतील. व ( ९१३ + ८५ = ) ९९८ पयत १४ मिळवावे लागतील. या पद्धतीनें शके ९९८ ला चांद्रसौर मानानें 'राक्षस' व वास्तव बार्हस्पत्य-मानानें 'पिंगल' संवत्सर राहील. म्हणजे, दोन्ही पद्धतींत २ संवत्सरांचा फरक राहील. ] म्हणजे शके ९९८ पर्यंत बार्हस्पत्य मानाची कालगणनापद्धति नर्मदेच्या दक्षिणेलाहि चालू होती. ९९८ पासून १०८३ पर्यंत आणखी एक अंक वाढवावयाला पाहिजे होता. शके १०८३ पासून ११६८ पयत आणखी एक. पण 'क्षय' संवत्सर मानण्याची ही पद्धति शके ९९८ नंतर बंद झाली असावी. म्हणजे, श. ९९८ नंतर दर ८५ वर्षांनीं एकेक अंक वाढविण्याऐवजी शके ९९८ च्या पूर्वी ८५ वर्षें प्रचारांत असलेली, शकाच्या संख्येंत १४ मिळवून संवत्सर काढण्याची पद्धति तशीच प्रचारांत राहिली.

शक – संवत्सरांची ही पद्धति सुमारें शके १२०० पर्यंत नर्मदेच्या दक्षिणेकडील कांहीं प्रांतांत व विशेषतः विदर्भांत रूढ होती असें दिसतें. म्हणूनच, विदर्भांत-ल्या मराठी हस्तलिखितांतील शके १२०० पूर्वींच्या अनेक कालोल्लेखांतील शक-संवत्सरांचा मेळ शकाच्या संख्येंत १४ मिळवून बरोबर जुळतो.

'शक ८२७ पासून दक्षिणेंत चांद्रसौर संवत्सर सुरू झालें' असें कै. शं. बा. दीक्षित म्हणतात. पण 'विवेकसिंधु', चक्रधराच्या कालनिर्णयाच्या दृष्टीनें डॉ. कोलते यांनीं 'अशास्त्रीय' व 'अनुपयोगी' ठरविले-ल्या महानुभावीय पोथ्या व 'अन्वयस्थळ', शिवाय, वर दिलेलीं शिलालेख व ताम्रपट यांचीं उदाहरणें यांतील कालोल्लेखांवरून सुमारें शके १२०० पर्यंत नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्वच प्रांतांत, व विशेषतः विदर्भांत, चांद्रसौर संवत्सराची पद्धति सर्रास सुरू झाली नव्हती असें म्हणावेसें वाटतें. तेथें, शके ९९८ पूर्वी ८५ वर्षें प्रचारांत असलेली व त्यानंतर स्थगित झालेली वास्तव बार्हस्पत्यपद्धतीच प्रायः रूढ होती. नर्मदे-च्या दक्षिणेला जरी चांद्रसौर संवत्सर सुरू झाला होता, तरी तो सर्व प्रांतांत एकदम सुरू झाला नसेल.

या पद्धतीनुसार 'विवेकसिंधू'तील शक-संवत्सरांचा मेळ तर जुळतोच. पण डॉ. कोलते यांनीं चक्रधरांच्या कालनिर्णयाच्या दृष्टीनें 'अशास्त्रीय' व 'अनुपयोगी' ठरविलेल्या पोथ्याहि शक – संवत्सरांच्या दृष्टीनें 'शास्त्रीय' व 'उपयोगी' ठरतात. पिल्ले-जंत्रीनुसार न जुळणाऱ्या 'अन्वयस्थळां'तील शकसंवत्सरांचा मेळहि या पद्धतीनुसार तंतोतंत जुळतो.

कालमापनात्मक गणितानुसारहि वरील विवेचनाची शास्त्रीयता पटवून देतां येईल. त्या व वराहमिहिराच्या गणिताचा ऊहापोह स्थलाभावामुळें येथें करतां आला नाहीं. त्यांचें विवेचन पुढील लेखांत करून 'विवेकसिंधू' चा व त्याच्या अनुषंगानें मुकुंदराजाचा कालनिर्णय करावयाचा आहे.

---

४० यानुसार शके ८२८ चा संवत्सर काढावयाचा असल्यास त्यांत १३ मिळवावे लागतील. अमोघ-वर्षाच्या वेंकटापूर शिलालेखांत 'शके ८२८; प्रभव संवत्सर –' असा उल्लेख आहे. [ Epigraphia Indica Vol. XXVI P. 60 ]. पिल्ले-जंत्रीनुसार 'प्रभव' संवत्सर शके ८२९ ( गत ) मध्यें येतो. वरील पद्धतीनुसार मात्र [ ८२८ + १३ = ८४१ ÷ ६० = शेष १ = 'प्रभव' ] शके ८२८ मध्यें 'प्रभव' संवत्सर बरोबर येतो.

४१ Robert Sewell यांनींहि कै. दीक्षित यांच्याबरोबर हा काळ शके ८२७ पर्यंतच मानला आहे. डॉ. कीलहॉर्न यांनीं मात्र हा काळ वेगळा मानला आहे. ( शके ८५५ ) [ 'Epi. Indica' Vol. 25 ] पिल्ले यांच्या जंत्रीवरून त्यांना शके ८९९ अभिप्रेत असावें असें दिसतें.








प्रा. व. म. परांजपे

# अमेरिकेचा श्रेष्ठ नाटककार यूजीन ओनील ( २ )

**' गोरी एला व नीग्रो जिम '**

यूजीन ओनील यांचे नीग्रो जीवनाचीं विविध अंगें दाखविणारे 'All God's Chillun got Wings' हें यापुढील नाटक नेहमींच्या मानसशास्त्रीय उपपत्तींच्या जडजंजालांतून बऱ्याच अंशीं सुटलेलें आहे. यामुळेंच कीं काय, सूक्ष्म, तरल भावांचा आविष्कार उठावदारपणें होऊन, नाट्यगुणांनींहि तें संपन्न झालेलें दिसतें. पहिला प्रवेश गोरीं व नीग्रो मुलें एकत्र खेळतां-नाचा आहे. पुढील प्रवेशांत ही दोस्ती वर्णभेदानें मलूल होते. जिम हॅरिस हा एक सरळ मनाचा नीग्रो छोकरा आहे. पण वांशिक उच्च-नीचतेच्या कल्पनांनीं निर्माण झालेल्या न्यूनगंडामुळें, जीवनाच्या झगड्यांत आपण यशस्वी होणारच नाहीं अशी त्यानें कल्पना करून घेतली आहे. असें असूनहि तो झगड्यापासून मागें मात्र सरत नाहीं. लहानपणींसुद्धां, खेळतांना, हरघडी गोऱ्या मुलांकडून ' कावळा ', ' चॉकोलेट ', ' काळाकुट्ट धूर ', ' निगर ' — ही हेटाळणी त्याला सहन करावी लागली. या कहरांतून सुटण्यासाठीं या वेड्या मुलानें एक दिवशीं खडू विरघळवून तें पाणीही पिऊन बघितलें. – हेतु हाच कीं गोरे व्हावें ! त्याच्या बाल-जगांत, एला डाऊनी ही एकटीच गोरी मुलगी त्याच्याशीं सहानुभूतीनें वागते. पुढें मिकि हा एक दुष्ट आणि बेफाम असलेला मनुष्य तिला फसवितो, आणि त्यामुळें तिच्यापुढें दोनच पर्याय उरतात : एक आत्महत्या तरी करावयाची, किंवा वेश्येचें जिणें तरी पत्करावयाचें. या परिस्थितींत, पूर्वीइतक्याच जिव्हाळयानें हॅरिस तिचा स्वीकार करण्याची तयारी दाखवितो आणि हें तिनें मान्य केल्यानें वाटणाऱ्या कृतज्ञतेमुळें, तिच्याशीं तो अधिकच नमून वागतो. परंतु पुनः लवकरच वांशिक उच्चनीचतेच्या कल्पनांनी हें विशुद्ध वातावरण गढूळ होतें आणि नवे प्रश्न उभे राहतात. केवळ रक्तांत भिन-लेल्या वांशिक स्मृती जाग्या झाल्यानें, ज्या न्यायाच्या आणि समतेच्या हक्कांसाठीं तो झगडत आहे, त्यांचा उपभोग घेण्याची संधि येऊनहि, तिचा लाभ घेण्यास तो असमर्थ ठरतो. या गोंधळलेल्या परिस्थितीं-त घोर निराशा पदरीं आल्यानें, मनांतून तो पार खरकून जातो. त्यांतच वकीलीच्या परीक्षेंत वारंवार येणारें अपयश त्याला अगतिक करून टाकतें. " पास ? पास ? हायरे देवा, – वेड्या पोरा असली मूर्खपणाची कल्पना तुझ्या डोक्यांत आली तरी कशी ? पास ? कोण मी ? जिम–कावळा–हॅरीस ? निगर जिम हॅरीस,– ' बार 'चा सभासद होणार ? नुसत्या कल्पनेनेच हंसून हंसून पोट दुखून येईल..." आपली ही ' महत्त्वा-कांक्षा ' किती असाध्य आहे या जाणिवेनें तो अगदीं हत-बुद्ध झाला आहे. त्यांतच हॅरिसनें केलेले उपकार एला विसरते. एलाच्या मनांतील वांशिक श्रेष्ठतेची जाणीव तिच्या बोलण्यांतून तडाखे देऊं लागते. ही वांशिक श्रेष्ठता म्हणजे अॅड्लर या मानसशास्त्रज्ञानें वर्णिलेल्या ' सत्ताप्रवृत्ती ' ( will to power ) चें प्रकट रूप आहे. या वेडाच्या भरांत जिमला नाहींसें करून टाक-ण्याच्या विचारापर्यंत तिची मजल जाते. सुदैव येवढेंच कीं जिम त्याला बळी पडत नाहीं. आपल्या श्रेष्ठतेवर मात करूं पाहणाऱ्या नीग्रो वंशाचें एलाच्या दृष्टीनें प्रतीक असणारा जिमचा कॉंगो मुखवटा ( Congo mask ) तिचें लक्ष्य बनतो. शेवटीं तिच्या मनाला शांति प्राप्त होते. पण त्यासाठीं, प्रौढत्व, विवेक आणि जीवनांतला रस यांची केवढी जबर किंमत तिला

---

प्रस्तुत लेखांत प्रा. व. म. परांजपे यांनीं **नोबेलपरितोषिकविजेता** श्रेष्ठ अमेरिकन साहित्यिक **युजीन ओनील** याच्या कांहीं प्रमुख नाट्यकृतींचा परिचय करून दिला असून, त्या अनुषंगानें त्या थोर प्रतिभाशाली नाटककाराच्या जीवनदृष्टींतील व कलेतील कांहीं प्रमुख वैशिष्ट्यांचें दिग्दर्शन केलें आहे. प्रस्तुत लेखांक हा उत्तरार्ध आहे. पूर्वार्ध गेल्या जुलैच्या ' नवभारतां 'त प्रसिद्ध झाला आहे. — का. सं.








द्यावी लागली! प्रौढत्वाबरोबर येणाऱ्या जबाबाऱ्या न पेलल्यानें या वादळांच्या तडाख्यांतून सुटण्यासाठीं ती पुनः मनाच्या निर्व्याज शैशवावस्थेंत प्रवेश करते.

ओनिलच्या नीग्रो-नाटक-त्रयींपैकीं या नाटकाचा मनावर होणारा आघात सर्वांत जास्त तीव्र आहे. एला आणि तिचा नीग्रो साथीदार यांच्या सहजसुंदर आणि वैशिष्ट्यपूर्ण स्वभावरेखांमुळेंच हें शक्य झालें आहे. मानसशास्त्रीय उपपत्तींचीहि या स्वभावरेखनाला मदतच झाली आहे. इतर कांहीं नाटकांप्रमाणें केवळ हौस म्हणून नाटककारानें त्या लादल्यासारखें वाटत नाहीं. अखेरी-अखेरीला नाट्यवस्तु, आध्यात्मिक, उदात्त भावनांनीं उजळून निघाली आहे. आधींच बाल-सदृश असलेल्या एलाचा बाल्यावस्थेंतील प्रवेश जिमच्या मनाला फार समाधान देतो. "संपलं,–सारं संपलं आतां तें, जिम. आतां सगळं कसं छान होईल. मी पुनः तुझी पूर्वींची छोटी एला होईन, आणि तूंहि माझा छोटा जिम हो! आपण पूर्वीं होतो तस्सें! आठवतंय तुला? मी पूर्वीसारखेंच तोंडाला काळें पॉलीश फाशीन, म्हणजे मग तूं गोरा दिसशील. लहानपणच्या सारखें आपण पुनः एकदां गोट्या खेळूं–पण तूं मात्र नेहमींच छोटा रहातां कामा नये. कधीं कधीं तूं अगदीं दयाळू असा 'जिमकाका' पण झालें पाहिजेस. करशील ना रे असं?" एला त्याला खळायला बोलविते. आणि जिमहि, विलक्षण भारावून जाऊन, तें कबूल करतो: "लाडके,–अगदीं स्वर्गाच्या दारापर्यंत, या खेळांत मी तुला साथ देईन".–पडदा पडतो. आणि "तुझ्यांत अंतर्बाह्य बदल होऊन, तूं स्वतः बालक बनल्याखेरीज, तुला स्वर्गांत प्रवेश नाहीं," या बायबलमधील उक्तीची आठवण झाल्याखेरीज रहात नाहीं. "All God's chillun have got wings.'

### ग्रीक पुराणकथेला नवा मानसशास्त्रीय अर्थ

ग्रीक पुराणांतील, ॲगॅमेम्नन, क्लिटेम्नेस्ट्रा, ओरिस्टिस व इलेक्ट्रा यांच्या सुप्रसिद्ध कथेची एका नव्या दृष्टिकोणांतून केलेली गुंफण 'Mourning Becomes Electra' या नाटकांत पहावयास मिळेल. मूळ कथेंतील भीषण नाट्यामुळें, सोफॉक्लीज, एस्किलस् आणि युरिपिडिस् या तीन महान् ग्रीक नाटककारांनीं त्यांवर नाटकें लिहिलीं आहेत. आधुनिक काळांतहि या कथेचा मोह अनेक नाटककारांना पडला आहे. स्पेनमध्यें गॅलडॉस (Gatdos), ऑस्ट्रियांत फॉन् हॉफमॅन्स्थॉल (Von Hoffmansthal), त्याचप्रमाणें रॉबिन्सन जेफर्स, रॉबर्ट टर्नी व ज्यॉ पॉल सार्त्रे (Jean-Paul Sartre) या सर्वांनीं आपापल्यापरीनें या कथेचें रहस्य उकलण्याचा प्रयत्न केला आहे.

ट्रॉयचें महायुद्ध नुकतेंच संपलें आहे. अनेक दिवसांनंतर मिळणारी विश्रांति, सुख यांचीं स्वप्नें रंगवीतच ॲगॅमेम्नन घरीं परतला. परंतु मधल्या काळांत त्याची पत्नी क्लिटेम्नेस्ट्रा ही एजिस्थसच्या प्रेमांत सांपडली होती. एजिस्थसनें याअगोदरच ॲगॅमेम्ननबद्दल क्लिटेम्नेस्ट्राचें मत कलुषित केलें होतें. सागरावरून मार्ग कापीत असतां, एकदां वारे साफ पडल्यानें, आर्टेमिस या देवतेस प्रसन्न करून घेण्याकरितां, ॲगॅमेम्ननने पोटची पोरगी इफिजेनिआ हिचा तिला कसा बळी दिला, याची साद्यंत हकीगत ऐकल्यावर, क्लिटेम्नेस्ट्राला नवऱ्याबद्दल कमालीचा तिरस्कार वाटूं लागला. त्याच्याच जोडीला एजिस्थसबद्दल वाटणाऱ्या प्रीतीमुळें, नवऱ्याची ही अडगळ शक्य झाल्यास दूर करण्यास ती उत्सुक झाली होती. ... ॲगॅमेम्नन घरीं परतला तो मोठ्या उल्हसित मनानें. डोळे दिपून जातील, अशा राजेशाही थाटांत क्लिटेम्नेस्ट्रानें त्याचें स्वागत केलें. त्याच्या मार्गावर मऊ, लुसलुशीत रुजामे पसरले होते. ॲगॅमेम्ननच्या स्मृती मनांत घोळवीत आपण किती एकाकीपणें आणि दुःखांत इतकीं वर्षें काढलीं याचें पत्नीच्या तोंडचें वर्णन ऐकून, ॲगॅमेम्ननहि सुखावला. 'इतक्या कष्टांमुळें फार दमला असाल' असें म्हणून मुद्दाम त्याच्याकरितां बांधलेल्या संगमरवरी स्नानगृहांत प्रवेश करण्याची तिनें त्यास विनंति केली. ॲगॅमेम्नन आंत उतरला मात्र, तोंच हिनें त्याच्यावर एक जाळें फेंकलें, आणि त्यांत तो गुंतल्यावर तीन तडाख्यांत त्याचा वध केला. पण क्लिटेम्नेस्ट्राच्या नशीबींहि सुख भोगणें नव्हतें. तिचा मुलगा ओरिस्टिस यानें आपली बहिण इलेक्ट्रा हिच्या मदतीनें या खुनाचा बदला घेतला, आणि आपली आई आणि तिचा प्रियकर या दोघांसहि यमसदनास पाठविलें. मातृहत्येच्या या पापाबद्दल ग्रीक देवता 'फ्यूरीज' यांनीं त्याचा छळ आरंभिला. यांतून त्याची







सुटका झाली ती ॲथिनी या देवतेचे कृपेमुळें. ॲथिनीचा अवतार झ्यूसच्या मस्तकांतून झाला असल्यानें तिला आई ठाऊकच नव्हती. व यामुळें ओरिस्टिसच्या असीम पितृभक्तीनें त्याच्यावर खूष होऊन तिनें त्याची सुटका केली.

या मूळ कथावस्तूवर हात फिरवितांना, ओनिलला ग्रीक नाटककारांपैकीं मुख्यतः एस्किलस्चा उपयोग झाला. आपल्या कथानकाची बाह्य रचना त्यानें एस्किलस्प्रमाणेंच केली आहे. मात्र पुत्राऐवजीं कन्येला आपल्या नाटकांत प्रमुख स्थान देतांना, ओनिलनें युरिपिडिसच्या 'इलेक्ट्रा'चा कित्ता गिरविलेला दिसतो. ग्रीक शोकांतिकांपैकीं एखाद्या जुन्या कथानकावर मानसशास्त्रीय उपपत्तींनी सजलेल्या आधुनिक नाटकाची उभारणी करण्याचें ओनिलच्या मनांत फार दिवस घोळत होतें. ग्रीक समाजांत प्रचलित असलेल्या कठोर नियतीच्या कल्पनेऐवजीं, आधुनिक काळांत ज्ञात झालेल्या मानसिक सुप्त शक्तीचा उपयोग करण्याचा त्याचा विचार होता. आजच्या या बुद्धिवादी युगांत, दैवी शक्तींनी दिलेल्या न्यायनिवाड्यांवर माणसांचा विश्वास बसणें कठीण व त्यामुळेंच त्यांच्या साहाय्यानें प्रेक्षकांच्या वृत्ती हेलावण्याचा प्रयत्न आजच्या काळांत यशस्वी होणें शक्य नाहीं. म्हणूनच ओनिलनें फ्राईड व युंग यांचा आसरा घेऊन, दैवी शक्तीवर आधारलेल्या ग्रीक शोकांतिकेला मानसशास्त्रीय उपपत्तींचीं आवरणें चढविण्याचा एक धाडसी प्रयत्न केला आहे. त्याची अशी खात्री होती कीं, "ज्या योगानें नाटकांतील व्यक्तिरेखांशीं आजचा प्रेक्षकहि समरस होऊं शकेल, अशीं नवीं रूपकें आणि मूल्यें यांचा वापर करून त्यांतूनहि शोकांतिकेची उदात्तता निर्माण करणें सहज शक्य आहे."

ओनिलच्या कथानकाचें सूत्र थोडक्यांत खालीलप्रमाणें आहे : एझ्रा मॅनन ( ॲगॅमेम्नन ) व ओरिन ( ओरिस्टिस ) युद्धावरून परतले आहेत. ते लढाईवर गेले होते त्या मधल्या काळांत एझ्राची पत्नी क्रिस्टिन ( क्लिटेम्नेस्ट्रा ) ही ॲडॅम ब्रँट-(एजिस्थस)-च्या प्रेमांत सांपडली. खरें म्हणजे ब्रँट हाहि मॅनन कुटुंबाचाच एक घटक. ॲबे मॅनन व डेव्ह मॅनन या दोन भावांपैकीं डेव्हची बायको मारि ब्रँतोम हिचा ॲडॅम हा मुलगा. भावाला फसवून व त्याची इस्टेट गिळंकृत करून, ॲबेनें डेव्हला घराबाहेर काढलें. त्यामुळें डेव्हची परिस्थिति फार खालावली, आणि पुढें डेव्ह मेल्यावर तर मारीला फारच वाईट दिवस आले. उपासमार आणि आजार यांनीं ती मृत्युपंथाला लागली. ॲडॅम यावेळीं तिच्यापासून फार लांब होता. म्हणून शेवटीं अगतिक होऊन तिनें एझ्राला पत्र लिहून कांहीं रक्कम कर्जाऊ मागितली. ॲडॅमच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास, "त्यानें तिला नुसतें उत्तर पाठविण्याइतपतहि चांगुलपणा दाखविला नाहीं.... आणि मी येईपर्यंत वेळ निघून गेली होती. माझ्या मिठींतच आईनें शेवटचा श्वास घेतला." यामुळें, त्याची क्रिस्टिनशीं जेव्हां प्रथम भेट होते, तेव्हां तिच्याबद्दल त्याला तिरस्कारच वाटत होता. या मॅनन घराण्यावर सूड उगवायला तिचा चांगला उपयोग होईल, या विचारानेंच त्यानें तिला प्रथम जवळ केली. परंतु "या द्वेषांतूनच माझें तिच्यावरील प्रेम निर्माण झालें" असें तो म्हणतो.

मूळ ग्रीक कथेप्रमाणेंच, ॲडॅमबरोबर सुखानें नांदतां येईल या आशेनें क्रिस्टिन एझ्राचा खून करते. परंतु याआधींच तिची मुलगी लॅविनिया ( इलेक्ट्रा ) हिनें ॲडॅमच्या बोलण्यांतून, त्याचा व क्रिस्टिनचा काय बेत ठरला आहे याचा सुगावा घेतला होता. त्यामुळें हा खूनच आहे, नैसर्गिक कारणांनी आलेला मृत्यु नव्हे, हें तिच्या सहज ध्यानांत येतें.—व त्यानें तिचा भडका उडाला. क्रिस्टिननें जरी असें कितीहि भासवायचा प्रयत्न केला कीं हा साधा मृत्यु आहे, तरीहि आपल्या आईचा यांत हात आहे हें लॅविनियानें ताडलें, आणि आपला भाऊ ओरिन यास सर्व हकीगत सांगून हा खूनच आहे अशी त्याची खात्री पटवून दिली. संतापून जाऊन ओरिननें ब्रँटला मारलें. क्रिस्टिनला आत्महत्येशिवाय मार्ग उरला नाहीं. ओरिनला वेड लागते, व तो स्वतःस मारून घेतो. लॅविनियाच्याहि साऱ्या आशा धुळीला मिळतात. 'Mourning Becomes Electra!'

अशा तऱ्हेनें या कथानकाचा थोडक्यांत गोषवारा सांगणें, म्हणजे ओनिलवर एक प्रकारें अन्याय होईल. सर्व महान् नाट्यकृतींप्रमाणें येथेंहि कथानकाला महत्त्व कमी आहे. या कथासूत्रांतून मानवी जीविताचें

जें वैशिष्ट्यपूर्ण दर्शन लेखकानें घडविलें आहे, त्यालाच खरी किंमत आहे. वरील रूपरेषेवरून या नाटकाच्या सौंदर्याची कल्पना येणें केवळ अशक्य आहे. या निर्जीव सांगाड्याला ओनिलनें स्पर्श करतांच, नाट्य-गुणांनी तो जिवंत होतो. क्लॅसिकल ट्रॅजेडीच्या चौकटींत बसविलेल्या या नाटकांत, मातृप्रेमाची आस, व मृत्यूनंतर मिळणाऱ्या पुनर्जन्मांतील गर्भावस्थेंत मिळणाऱ्या सुरक्षिततेची तीव्र इच्छा, या दोन कल्पनांवर ओनिलनें विशेष भर दिला आहे. प्रेम आणि मनःशांति यांची ओढ लागलेल्या अनेक व्यक्ती आपणांस त्याच्या नाटकांत आढळतील. यासाठीं त्यांनीं अनुसरलेल्या मार्गांत तेवढी भिन्नता आढळेल. त्याच्या निनानें anasthesia चा आश्रय केला. लॅरी स्लेडनें दारू व pipe-dreams यांचा, तर जेम्स टिरोनीला दारू व मरण यांतच हवी असलेली शांति मिळाली. अशीच हृदयांत कळ निर्माण करणारी आस लॅविनियाच्याहि मनाला लागली आहे. "प्रेमापुढें इतर कशाचीच क्षिती नाहीं. तें अमोल आहे. शांतीचेंहि तसेंच आहे. आणि ती मिळालीच पाहिजे."

## मृत्यु आणि आईच्या गर्भांतील शांति

जन्म घेतला कीं मृत्यूचें जीवघेणें दुःख मागें लागलेंच या विचारानें शोकाकुल झालेली 'Strange Interlude' मधील नीना "पुरुष-रूपांत ईश्वराला कल्पिण्याची जी घोडचूक आपण करीत आलों, ती दैवी शक्तीला मातेचें रूप देऊनच सुधारतां येईल," असा त्यावर उपाय सुचवितें. पिता म्हणून देवाला पूजीत आल्यानें जीवनाचा अगदीं विचका झाला आहे! तें जीवन कसलें, असून नसल्यासारखेंच! म्हणूनच हीं सर्व माणसें, आईच्या गर्भांत मिळणाऱ्या शांतीची वाट पहात राहतात. त्यासाठींच मृत्यु आणि त्यानंतरचा पुनर्जन्म त्यांना हवा आहे. ईश्वराची आराधना मातृस्वरूपांत केल्यासच हें प्राप्त होईल. 'Mourning Becomes Electra' ची मध्यवर्ती कल्पना हीच आहे. 'The Great God Brown' या नाटकांतहि 'womb and grave' (गर्भ आणि थडगें) यांची अशीच विलक्षण सांगड घातली आहे. प्रेमाची सांगता मातृ-प्रेमांतच आहे, आणि मातेच्या गर्भांत मिळणारी शांति ती खरी शांति, हें या सर्वांचें सार आहे.

"In Electra, the Mother is a primordial image, an archetypal experience shared by all of the Mannons. 'The strange beautiful hair' is the visible symbol used to identify Lavinia with Christine and both with Marie Brantome, thus tying all the mothers together." हें एका समीक्षकानें केलेलें विवेचन, ही कल्पना समजण्यास उपयोगी पडेल. ॲडॅम क्रिस्टिनवर प्रेम करतो, कारण तिच्यामुळें त्याला आपल्या आईची आठवण होते. आणि याच कारणानें तो पुढें लॅविनियाकडे आकर्षिला जातो. एझराला क्रिस्टिनबद्दल वाटणारें प्रेम, किंवा ओरिनला आई वा बहिणीबद्दल वाटणारी माया, या सर्वांचा उगम शेवटीं एकच आहे. 'The Blessed Isle' या आणखी एका प्रतीकाचा उपयोग, मॅननकुटुंबाला वाटणाऱ्या प्रेम आणि शांतीची लागलेली ओढ दाखविण्याकरितां केला आहे. लॅविनिया, ब्रॅंट, ओरिन, एझरा – सगळेजण या 'शांतिधाम' असलेल्या बेटाचा उल्लेख करतात. आत्महत्येचा निश्चय झाल्यावरचे, ओरिनचे उद्गार असे आहेत: "हा शांतीचा मार्ग आहे – त्यांतूनच त्या हरपलेल्या श्रेयाची प्राप्ति होईल. – मृत्यु हेंहि एक शांतिस्थान आहे–आई माझी तिथें वाट पहात असेल!" रोजच्या मरणांतून सुटका करून घेऊन, मृत्यूच्या वाटेनें, पुनर्जन्मांतील शांति मिळविण्याचा तो एक प्रयत्न आहे. मॅनन कुटुंबाच्या दृष्टीनें 'जन्मास येणें म्हणजे मृत्यूची वाटचाल करूं लागणें! मृत्यु म्हणजे पुनर्जन्म!' 'Bound East for Cardiff' पासून पुढील नाटकांतील, आयुष्याला विटलेल्या सगळ्याच व्यक्तींना मरणाचा घोर लागला आहे. या मृत्यूलाच फ्राईडनें 'The goal of life' असें संबोधिलें आहे. याच विवक्षित कल्पनेचा विकास ओनिलनें 'The Moon for the Misbegotten' मध्यें केला आहे.

ग्रीक नाटककार नियती-(Fate) ला जें स्थान देतात, तेंच स्थान ओनिल मानवी मनाच्या गूढ








रहस्यमय वर्तनाला देतो. माणसाचा अपराध असो वा नसो, या मानसिक प्रवृत्तींच्या वावटळींत तो सांपडला, कीं त्याचा नाश ठरलेला. Great God Brown म्हणतो त्याप्रमाणें " माणूस जन्माला येतो, तोंच पिचलेला, मोडलेला अशा स्थितींत. " जेफर्सच्या कॅसड्राचें उद्गार असेच आहेत : " No crime is a crime; the slaying of the king was a meeting of two bubbles on the lip of the cataract. One winked..."

शोकांतिकेचें मर्म समजावून देतांना, शोपेनहावरनें लिहिलें आहे कीं, " यांतील नायक ज्या पापाचें प्रायश्चित्त भोगतो, तें पापाचरण त्यानें स्वतः केलेलें नसतें. अॅडॅमपासून चालत आलेला ' मूळ पापा-' ( original sin ) चा तो वारसा आहे. जन्मास येणें हेंच तें पाप होय. " ' Mourning Becomes Electra ' मध्यें ओनिलनें हाच विचार मांडला आहे. क्रिस्टिन कळवळून विचारते, " आपली प्रेमळ, निष्पाप, निरागस वृत्ति सतत कां टिकून रहात नाहीं ?" तिनेंच पुढें याचें उत्तर दिलें आहे : " पण देव नाहीं आपल्याला तसा मोकळा सोडणार ! इतरांच्या आयुष्याशीं आपल्या आयुष्याची अशी कांहीं विचित्र निर्गांठ तो वांधून ठवतो, कीं त्यांत होणारी मनाची पिळवणूक आणि त्याच्या वेदना यांमुळें वैतागून शेवटीं आपण एकमेकांच्याच जीवावर उठतों ! "

**मानवाचें रहस्य उलगडण्याचा अट्टहास !**

या नाटकाचे हे तीन भाग ओनिलनें आपल्या ऐन उत्कर्षाच्या काळांत लिहिले आहेत. त्यांतील मानसिक अस्वस्थतेचा आविष्कार व त्याचें यथायोग्य दर्शन घडविणारें नाट्ययंत्र, या दोन्हींमुळें हीं नाटकें फार परिणामकारक झालीं आहेत. परंतु हे सर्व गुण असूनहि, मनावर कायम ठसा उमटून जाईल अशी उदात्त शोकांतिका निर्माण करण्यांत मात्र ओनिल यशस्वी झाला नाहीं. या नाटकांची रचनाच संपूर्ण आधुनिक धर्तीची असल्यानें, ग्रीक नाटकांचा रचनेचा डौल व त्यांतील उदात्तता येथें येऊं शकत नाहींत. कितीहि दुःखद प्रसगांचें भेदक चित्रण ग्रीक नाटककारांनीं केलें असलें, तरी जीवनाबद्दल त्यांना तिरस्कार कधींच वाटला नाहीं. मृत्यूला भिऊन, गर्भांत मिळणाऱ्या सुरक्षिततेच्या मार्गेहि ते कधीं लागले नाहींत. ओनिलच्या नाटकांत वारंवार व्यक्त होणारा, आयुष्यांतला थकवा, आणि त्यानें निर्माण होणारी सर्वांबद्दलची नावड, हीं ग्रीक नाटककारांत आढळणार नाहीं. याच दृष्टीनें, " Electra offers a solution not to the problem of existence but to that of non-existence: it reconciles not to life, but to death " व " O' Neill's tragedy has never been able to to achieve the condition of ' Catharsis '. He preferred ' narcosis or necrosis ' " एका टीकाकाराचीं दोन्हीं विधानें सार्थ वाटतात.

परंतु ओनिलचें सर्वांत मोठें वैगुण्य कोणतें असेल, तर तें म्हणजे मानसशास्त्रीय उपपत्तींवरील त्याचा गाढ विश्वास ! त्याच्या नाटकांचें तेंच उगमस्थान आहे. कोणतीहि विचारप्रणाली जीवनांतली विविधता सौंदर्य सामावून घेऊं शकत नाहीं, याचें आकलन ओनिलला शेवटपर्यंत होऊं शकलें नाहीं. या दोषाचा एक मात्र असा फायदा होतो, कीं एकदां त्याच्या नाट्यवस्तूचें मुख्य सूत्र हातांत मिळालें कीं झराझर सारें गूढ उकलूं लागतें. फक्त याला फायदा म्हणावा कीं नाहीं हें ठरविणें कठीण आहे. शेक्स्पिअरसारख्या महान् कलावंताच्या बाबतींत, सर्व कांहीं आकलन झालें, गूढ कांहीं राहिलेंच नाहीं,— असें घडूंच शकत नाहीं. नाटककर्ता नेहमींच कांहींतरी हातचा राखून ठेवीत आहे असें वाटतें. आकलन न झाल्यानें मनाला अस्वस्थ करणाऱ्या या नाट्यगुणांमुळेंच, त्या नाटकांना भव्यता, गूढरम्यता प्राप्त होते. ओनिल मात्र एखाद्या कसलेल्या शिक्षकाप्रमाणें, प्रत्येक समस्येचें उत्तर शक्य तितक्या स्पष्टपणें देण्याचा प्रयत्न करतो. कांहीं समस्यांना उत्तर असूंच शकत नाहीं हें त्याला पटत नाहीं. लहान मुलानें आपल्या चिमुकल्या हातांत सूर्यकिरण पकण्याची धडपड करावी, त्याचप्रमाणें आपल्या उपपत्तींनी मानवाचें रहस्य उलगडण्याचा त्याचा अट्टाहास हास्यास्पद ठरतो. मॅक्स ईस्टमनला त्याच्या मित्रांचें अनेक वेळा सांगणें असें कीं, " तुझ्या काव्याला तूं क्रांतीचा साज चढव. " त्यावेळीं त्यानें दिलेलें उत्तर संस्मरणीय आहे; " स्वातंत्र्यापेक्षांहि जीवन श्रेष्ठ आहे. क्रांतीहूनहि त्याचा मान मोठा








आहे. शत्रु असो अगर मित्र असो, दोघांच्याहि घरांत हा अग्नि सारख्याच तेजानें तळपत असतो. आणि मला जर विचाराल, तर माझें खरें प्रेम आहे जीवनावर !" ओनिल मात्र प्रत्येक नाटकांत कोणत्या ना कोणत्या उपपत्तीच्या किल्लीनें जीवनाचीं सारीं दालनें उघडून, त्याचा अथांगपणा, त्याचें रहस्य यांचें सम्यक् ज्ञान करून घेण्याचा निष्फळ प्रयत्न करतो. यामुळेंच त्याच्या नाटकांना एक परिमाणच कमी आहे असें भासतें.

ओनिलच्या सर्व प्रमुख कलाकृतींची ओळख करून देणें स्थलाभावीं शक्य नाहीं. परंतु वर नमूद केलेल्या त्याच्या कांहीं महत्त्वाच्या नाटकांच्या आधारें, ओनिलच्या नाटकांत प्रत्यहीं संपन्न होणाऱ्या व सूक्ष्मतर भाव व्यक्त करणाऱ्या एका विशिष्ट कलात्मक रचनेचा पद्धतशीर विकास झालेला दिसून येईल. अभिजात कलावंत असल्यानें, ओनिल नाट्यतंत्रांत नित्य नवे प्रयोग करतांना आढळून येईल. मुखवटे, ढोलक्याचा नाद, प्रकाशयोजना इत्यादींच्या साहाय्यानें शब्दातीत भावना व्यक्त करण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. सुरुवातीच्या नाविक-जीवनावरील नाटकांतील हाणामारीची जागा, पुढें अंतर्मनांतील कल्लोळानें घेतली आहे. हें करीत असतांना नवीन तंत्र-प्रयोग करणें अत्यावश्यक होतें. एकूण नाटकाचें यश, हें कथानकाची खोली व त्याच्या योग्य आविष्काराकरितां योजलेली नाट्यरचना यांवर अवलंबून राहतें. या दोन्ही दृष्टींनी विचार करूनच ओनिलच्या यशाचें मोजमाप करतां येईल.

अनेक नाणावलेल्या टीकाकारांनीं ओनिलवर केलेल्या टीकेचा एकूण सूर कांहीं फारसा अनुकूल नाहीं. त्याच्या नाटकांत वेळीं-अवेळीं तुफान हाणामारीमुळें बसणाऱ्या धक्क्यांनीं बऱ्याच टीकाकारांना हैराण केलें आहे. स्ट्रिंडबर्गची भ्रष्ट नक्कल, शब्दांसाठी करावी लागलेली केविलवाणी धडपड, व तें साधलें नाहीं म्हणजे भरमसाट उद्गारवाचक चिन्हांची केलेली खैरात, – यांमुळें नाटकाच्या वाक्संपन्न जगांत शब्दाभावीं मुकेपणानें वावरणारा ओनिल, हा एक मोठा चमत्कारिक विरोधाभासच नव्हे काय ? फ्रॉईड व ॲड्लरच्या मानसशास्त्रीय उपपत्तींच्या मुबलक वापरामुळें बरेचसे सामान्य वाचक तर धास्ताऊनच जातात ! ओनिलवर लिहितांना, त्याची अपरिपक्व शैली, उदात्त तत्त्वापासून चार हात दूर राहणाऱ्या त्याच्या शोकांतिका, आणि राणा भीमदेवी थाटांतले त्याचे संवाद, यांचा टीकाकारांनी खरपूस समाचार घेतला आहे. तो वाचला, म्हणजे ओनिलला अजून नाट्यप्रांगणांतून हद्दपार कसें केलें नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें. परंतु हें तर राहिलेंच. उलट, नोबेल पारितोषिक देऊन त्याचा सन्मान केला हें पाहिलें म्हणजे मात्र या उलटसुलट प्रकाराचा अर्थ तरी काय हें समजावून घेण्याची जिज्ञासा बळावल्याशिवाय रहात नाहीं. या विरोधाभासामागील खरें सत्य काय आहे ?

## जीवन गतिमान् बनविणाऱ्या शक्तीचें दर्शन

इब्सेनचें नेहमीं एक असें म्हणणें असें कीं नाटककार आपल्या नाटकांत जरी जागतिक संघर्ष रंगवीत असला तरीहि प्रत्यक्ष स्वानुभवाच्या आवरणांतच तो त्यानें प्रकट केला पाहिजे. "आणि ज्यांतून आपण स्वतः गेलों आहों, अशा या अनुभवांतच आधुनिक वाङ्मयाचें सारसर्वस्व सांठविलेलें आहे." ओनिलनें अनुभवलेल्या आयुष्याच्या छटा इतक्या बहुविध होत्या कीं त्यांवर नाटकें रचणें त्यास सहज शक्य झालें. त्याच्या नाटकांतील पात्रेंच नव्हत तर प्रत्यक्ष प्रसंगहि ओनिलच्या जीवनांतून जसेच्या तसे उचलून घेतलेले दिसतात. त्याच्या नाट्यसंसारांत ज्या भावनाविवश, बेफाम, नशिबाला सतत बोल लावणाऱ्या सागरपुत्रांच्या शोककथा निर्माण झाल्या आहेत, ते सर्व खलाशी नेहमींच्या जगांतले त्याचे भाईबंद होते. मनांत किंचित् दुःखाची छटा निर्माण करणारें सागराचें अविनाशी सौंदर्य या नावाड्यांना एका विचित्र तऱ्हेनें मोहून टाकतें. हा अथांग जलाशय किती भयानक आहे याची जाणीव असूनहि त्याच्याकडे ते ओढले जातात. मनावर पडलेली ती भुरळ त्यांना आंधळी बनविते. त्याचबरोबर निसर्गाच्या सान्निध्यांत त्यांना वाटणारा एकाकीपणा ओनिलनें फारच परिणामकारक रीतीनें चित्रित केला आहे. जीवनाचा बेफामपणा स्वतः या पात्रांनीं अनुभविला असल्यानें, त्यांच्या आयुष्यांतील, – एका बाजूला हे दुबळे जीव आणि दुसऱ्या बाजूस निर्घृण, महाबलाढ्य सागर, – अशी ही झुंज रंगवितांना ओनिल त्याच्याशीं समरस होऊं शकतो. त्यांतूनच त्याची विदीर्ण पुरुषार्थाची किंवा विदीर्ण जीविताशेची (Broken Manhood) ची कल्पना पुढें आली.










अनुक्रमणिका

केवळ या लढ्याचें वर्णन करून ओनिल थांबत नाहीं. त्याच्या दृष्टीनें हा लढा म्हणजे, नावाड्यांच्याच नव्हे तर प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत घडणाऱ्या प्रचंड संघर्षाची केवळ एक लहानशी चुणूक आहे. या सर्वस्पर्शी संघर्षाचें यथार्थ चित्रण करण्याचीच त्याची धडपड आहे. "अनेक आधुनिक नाटकांचा पल्ला केवळ माणसामाणसांतील विचार-व्यवहारांइतकाच जाऊं शकतो. पण माझें मन मात्र त्यांत विशेष रमत नाहीं. मानव व ईश्वर – या संबंधाबद्दल मला जास्त कुतूहल आहे," असें ओनिलनें या संबंधांत लिहिलें आहे. मानवी जीविताचें विश्लेषण करतांना आधुनिक मानसशास्त्राच्या परिभाषेंत व्यक्त झालेला जीवन-मरणाचा झगडा ओनिलला विचार-प्रवृत्त करतो. हें त्याच्या नाटकांचें मुख्य सूत्र आहे. व त्याला, प्रेम-तिरस्कार, श्रद्धा-अश्रद्धा, सत्य – आभास यांच्यांतील द्वंद्वांमुळें उठाव मिळाला आहे. जीवनांतील अंतिम सत्य शोधून काढून त्यापासून मिळणाऱ्या अक्षय्य आनंदासाठीं त्याची ही कधीं न संपणारी मुशाफिरी चालू आहे. त्याचीं सर्व पात्रें त्याच्यासारखींच सतत अतृप्त आहेत. त्यांच्या मनाचा गोंधळ उडाला आहे. आणि या संभ्रमावस्थेचा अपरिहार्य परिणाम म्हणजे त्यांचा जीवनमूल्यांवरील विश्वास उडून गेला आहे. हें सारे जीव आयुष्याला वैतागले आहेत, मृत्यूची ते प्रतीक्षा करीत आहेत.

तोल सुटल्यानें दुर्दैवाच्या गर्तेंत लोटल्या जाणाऱ्या या व्यक्तींच्या कथांतून, ओनिल उदात्त शोकांतिकेच्या उंबरठ्यापर्यंत येऊन पोहोंचला आहे. वैफल्यांतून निर्माण होणाऱ्या या दुःखद कथांवर आधुनिक जीवनाची दाट छाया पडली आहे. येथें मृत्यु येतो, तोहि त्याच्या दिमाखानें नव्हे तर चोरट्या पावलानें, थबकत, कुरकुरत! जगण्याइतकेंच मरणहि दुबळें आहे. त्यामुळेंच त्याच्या नाटकांत अस्सल शोकांतिकेची उदात्तता आढळून येत नाहीं. पण म्हणून तीं नाटकें कमी परिणामकारक आहेत, असें मात्र नाहीं. बुजगावण्याप्रमाणें पोकळ असणाऱ्या आधुनिक माणसाच्या आयुष्यांत जुन्या अर्थानें उदात्तता डोकावणें कठीणच! परंतु त्याची उणीव जीवनाच्या विशाल व सखोल जाणिवेनें ओनिलनें भरून काढली आहे. ओनिलच्याच शब्दांत सांगायचें झालें तर "जीवनाला गतिमान् बनविणाऱ्या अज्ञात व महाबलाढ्य शक्तींचें निदान अस्पष्टसें दर्शन माझ्या कलाकृतींत घडावें अशी माझी उत्कट इच्छा आहे."

## स्वतंत्र प्रज्ञेचा विलास

ओनिलच्या बहुतेक सर्व टीकाकारांनीं त्याच्या नाट्यतंत्राची मुक्त कंठानें स्तुति केली आहे. स्थलाभावीं त्याचें विवेचन करणें शक्य नाहीं. बहुतेकांच्या मतें त्याच्यांत मोठी उणीव एकच आणि ती म्हणजे त्याच्याजवळ भाषाप्रभुत्व नाहीं. खरें म्हणजे या गोष्टीचा जरा जास्तच बाऊ केला आहे असें वाटतें. हा दोषारोप जर सर्वस्वीं खरा असता, तर नाटककार म्हणून पुढें येणेंच त्याला शक्य नव्हतें. यासंबंधीं एका ऑस्ट्रेलियन टीकाकारानें असे उद्गार काढले आहेत कीं, "मानवी भावनांचें व विचारांचें प्रतिबिंब मिळूं शकेल असे संवाद लिहिणें ओनिलला जमलें नाहीं. त्यामुळें एखाद्या स्पंजाप्रमाणें तो आपल्या संवादांना अर्थासाठीं पिळून काढतो". या उद्गारांतील अतिशयोक्ति ध्यानांत येण्यास ओनिलच्या महत्त्वाच्या नाटकांतील कांहीं वेंचक संवाद वाचले तरी पुरें आहे. नुसती त्याच्या पात्रांमध्यें दिसून येणारी विविधता व त्यांचीं वेगळाली मानसिक परिस्थिति लक्षांत घेतली तरीहि हा आरोप किती उथळ आहे तें दिसून येईल. आपापल्यापरीनें त्यांतील प्रत्येकजण दुसऱ्यापासून निराळा आहे. त्यांच्या मानसिक संघर्षाची आकृतीहि पार भिन्न आहे. व्यक्तित्वाचा हा निराळेपणा – नाटक – व कादंबरीवाङ्मयाचें प्रधान अंग आहे. प्रत्येक पात्राच्या बोलण्यांतून, वागण्यांतून त्याचें वैशिष्ट्य जर वाचकाला आकलन होत असेल तर ओनिलला भाषेच्या बाबतींत दुबळा ठरवितां येणार नाहीं. त्याचप्रमाणें भाषेंतूनच जर ओनिल इतक्या प्रकारचे मानसिक संघर्ष व्यक्त करूं शकत असला तर आपल्या संवादांची निष्फळ ओढाताण तो करीत आहे हें म्हणणें बरोबर ठरणार नाहीं.

या आरोपाचें खरें मूळ असें आहे कीं कांहीं विशिष्ट गोष्टींची वा प्रसंगांची खुलावट करणें ओनिलच्या प्रकृतीलाच झेंपत नसल्यानें अट्टाहासानें तो हें करूं लागला तर त्याची मोठी केविलवाणी परिस्थिति होते. शैलीला कृत्रिमता येऊं लागतें व दिखाऊ, बोजड लिखाण तो लिहूं लागतो. आपल्या या दोषाची थोडीफार जाणीव ओनिललाहि होती. परंतु एकदां







प्रतिभेची धुंदी चढली कीं तो स्वतःला आवरूं शकत नाहीं. बेफाम संवाद आणि हाणामाऱ्यांचे प्रसंग यांनीं तो आपला हेतु साध्य करण्याचा प्रयत्न करूं लागतो. व यांतूनच त्याच्या नाट्यवैभवाला हिणकस कळा येऊं लागते. थोडक्यांत म्हणजे उदात्त शोकांतिकेच्या जवळ येऊनहि, ओनिल अस्सल शोकांतिका लिहूं शकला नाहीं. त्याच्या हातांत ती एक करुणरम्य, बेताल कथा बनते. ती शोकांतिका उरतच नाहीं.

पण दुःखांतिका, सुखांतिका इत्यादि नाट्यप्रकारांच्या सांचेबंद चौकटींतून जरा बाहेर डोकावलें, तर ओनिलच्या ठिकाणीं एका असामान्य प्रतिभाशक्तीचें अस्तित्व आपणांस जाणवून येईल. यामुळेंच मानवी संघर्षाचें करुणरम्य चित्र तो रेखाटूं शकला. या संघर्षामागची विशालता व आर्तता प्रेक्षकाला जाणवून देण्यासाठीं उपयोगांत आणलेल्या नाट्यतंत्राच्या योजनेंतहि त्याच्या स्वतंत्र प्रज्ञेचा विलास आढळतो. ओनिल कदाचित् तंत्रदृष्ट्या निर्दोष सुखांतिका अगर शोकांतिका लिहूं शकला नसेल. परंतु प्रेक्षकाच्या मनांत काहूर निर्माण करणाऱ्या त्याच्या नाटकांमुळें अमेरिकन वाङ्मय-जगतांत, आजच्या युगाचा प्रवक्ता म्हणून त्याचें स्थान फारच वरच्या दर्जाचें राहील.

---

## • श्रेष्ठ शास्त्रज्ञांचा युद्धाविरुद्ध इशारा

अण्वस्त्राचें भयंकर संहारसामर्थ्य लक्षांत घेऊन जगांतील राष्ट्रांनीं आतां युद्धमार्गाचाच त्याग करावा अशा अर्थाचें एक विनंतिपत्रक सुप्रसिद्ध गणिती आणि तत्त्वज्ञानी बर्ट्रंड रसेल यांनीं ९ जुलै १९५५ रोजीं लंडन येथें प्रसिद्ध केलें आहे. या पत्रकावर आइन्स्टाइन, व इतर सात जगद्विख्यात शास्त्रज्ञ यांच्या सह्या आहेत. " या पत्रकांतील प्रत्येक शब्दन् शब्द मला मान्य आहे अशा अर्थाचें आइन्स्टाइन यांचें उत्तर ज्या दिवशीं मला मिळालें त्याच दिवशीं ते निधन पावल्याची बातमी कळली. या पत्रकांतील विचार नमूद करणारें त्यांचें उत्तर हें त्यांचें शेवटचें सार्वजनिक कार्य होय " असें रसेल यांनीं पत्रक प्रसिद्ध करतांना सांगितलें. त्या पत्रकाचा सारांश पुढें दिला आहे :

" भावी महायुद्धांत अणुशक्तीचीं अस्त्रें उपयोगांत आणलीं जातील हें निश्चित. या संहारक अस्त्रांमुळें सर्व मानवजातच जगांतून नष्ट होण्याचा धोका निर्माण झाला आहे. हैड्रोजन बॉंबमुळें मोठमोठीं शहरें तर नष्ट होऊन जातीलच. शिवाय, त्या शहरांबाहेरील विस्तृत भूभागांवरहि हैड्रोजन बॉंबचे परिणाम हळु हळुं न कळत होत जाऊन, तेथील जीवसृष्टि नष्ट होईल ! बिकिनिबेटावर जे हैड्रोजनबॉंबचे प्रयोग झाले त्यांवरून या अस्त्रांचें संहारकस्वरूप स्पष्ट झालें आहे. हिरोशिमा ज्या अणुबॉंबनें नष्ट झालें त्याच्या २५०० पट भयंकर आणि सामर्थ्यशाली असा हैड्रोजन बॉंब आज तयार करतां येणें शक्य झालें आहे. हैड्रोजन बॉंबचा स्फोट झाल्यावर त्याचे 'रेडिओ-ॲक्टिव्ह' कण दूरवर सर्वत्र पसरतात, हवेंत मिसळतात, हळुंहळुं धूलिकणांच्या व पावसाच्या रूपानें जमीनीवर येतात आणि सर्वच पदार्थ आपल्या प्राणघातक विषारानें दूषित करून टाकतात. जपानी समुद्रांतील मासे आणि ते मासे पकडायला गेलेले जपानी कोळी यांच्यावर हैड्रोजन बॉंबच्या विषारी कणांचे जे परिणाम झाले ते सर्वांना विदितच आहेत. म्हणून भावीयुद्धांत हैड्रोजन बॉंबच्या हल्ल्यांत प्रत्यक्ष सांपडणारे तर तात्काळच मृत्युमुखीं पडतील. पण त्यापेक्षांहि भयंकर म्हणजे इतर असंख्य माणसें बॉंबच्या विषाची बाधा होऊन असाध्य रोगानें खंगत झिजत जाऊन मरतील !

" भावी युद्धांत हैड्रोजन बॉंबसारख्या अणुशक्त्यस्त्रांच्या उपयोगालाच बंदी करावी म्हणजे हा धोका टळेल असें जें कांहींना वाटतें तो त्यांचा वेडा भ्रम आहे. एकदां युद्ध सुरूं झालें कीं ही बंदी कोण पाळणार ? दोन्हीहि बाजू हैड्रोजन बॉंब तयार करायला लागतील.

" म्हणून जगांतील सर्व राष्ट्रांना आणि त्यांच्या सत्ताधाऱ्यांना आमची अशी आग्रहाची विनंति आहे कीं महायुद्धानें आपलें अभीष्ट साध्य होणार नाहीं हें त्यांनीं तात्काळ ओळखून, तसें जाहीर करावें आणि आपापसांतील मतभेदाचे व वादाचे मुद्दे त्यांनीं सामोपचारानें, शांततामय मार्गांनीं मिटवावेत. ही आमची प्रार्थना आम्ही कोणा एका देशाचे, खंडाचे, धर्माचे वा पंथाचे म्हणून करीत नसून, ज्या मानवजातीचें अस्तित्वच धोक्यांत येऊं पहात आहे त्या मानवांपैकीं एक मानव म्हणून करीत आहोंत. " ('टाइम्स ऑफ इंडिआ' वरून १०।७।५५).








कानुंगो-अहवाल-परीक्षणाच्या निमित्तानें : श्री. श्री. रा. टिकेकर

# हातमागांचें वैशिष्ट्य

कापड विणण्याचा धंदा आमचेकडे फार पुरातन काळापासून चालत आला असला तरी त्याजवर पाश्चिमात्त्यांची करडी नजर गेल्या दोन अडीचशें वर्षांतच पडली. ईस्ट इंडिया कंपनीनें येथून रंगीत व सफेत कापड इंग्लंडमध्यें नेण्यास सुरुवात केली तेव्हां गिऱ्हाईकांना तें फार आवडलें – त्याची चहा पुष्कळ झाली. परंतु बनयेगिरींत मुरलेल्या ब्रिटिशांना आपल्या देशांतील उद्योगधंद्यांची काळजी अधिक वाटली म्हणून म्हणा अगर भारतीय धंदा नीट चालूं नये, अशी त्यांची आसुरी वृत्ति बळावली म्हणूनहि असेल कदाचित्, तलम सुताचे विणकर, सूत कातणारे ' चरखेवाले ' यांजवर त्यांची जहरी नजर वळली. ' आंगठे कापून ' टाकल्यानें तलम सूत कातणारांची संख्या हळुहळु कमी होत गेली. तरी गिरण्यांतलें तलम सूत आयतें मिळत गेल्यानें विणकर मात्र अद्याप तगून आहेत. प्रथम ब्रिटिश गिरण्यांनीं व अलीकडे भारतीय गिरण्यांनीं तलम सूत पुरवून हातमागांवरील विणकर अद्याप कसाबसा जिवंत राखिला आहे. महात्मा गांधींच्या चळवळीमुळें चरख्याचें पुनरुज्जीवन झालें असलें तरी ' हातमाग ' धंद्याला त्यानें जबरदस्त धक्का पहिल्या लाटेसरशीं दिला. वरपांगीं हें विधान पटणार नाहीं. पण जरा अधिक विचार केल्यावर त्याची सत्यता पटेल.

आजच्या नव्या नेहरू-राजेंद्र अमदानींत हातमागांना पुनः चलती लाभत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. परंतु हातमागांचें खरें वैशिष्ट्य कोणतें, त्यांवरील कापड खरीदण्यांत ग्राहकांचा फायदा-तोटा किती, हातमाग व गिरण्या यांच्या चढाओढींत तगणार – जगणार – मिरविणार कोण, इत्यादि प्रश्नांबद्दल वाटणारें कुतूहल कायम रहातें – त्यांबद्दल समाधानकारक उत्तरें मिळणें मुष्कील होतें. हा लेख लिहिण्यांत हातमागांची खास कामगिरी कोणती हें दाखवून त्यांवरील अन्यायाची दाद लावण्याचा हेतु आहे. मध्यवर्ती सरकारनें ( पार्लमेंटनें ) नेमलेल्या कानुंगो-समिती ('टेक्सटाइल इन्कायरी कमिटी) ' च्या अहवाल-परीक्षणाच्या निमित्तानें हातमागांची खरी व न्याय्य बाजू मांडावयाची आहे. मोठ्या कापड-गिरण्यांचा किंवा पॉवरलूम कारखान्यांचा प्रश्न या लेखांत विचारांत घेतलेला नाहीं. त्याचप्रमाणें सरकारमान्य हँडलूम बोर्डा-(मध्यवर्ती )च्या कामगिरीची छाननीहि प्रस्तुत लेखांत नाहीं. विशेषतः पावरलूम-धंद्याची बिकट अवस्था व महाराष्ट्रांतील त्याची व्याप्ति लक्षांत घेतां त्या संबंधीं स्वतंत्रपणेंच विवेचन व्हावयास हवें. प्रस्तुत लेखकानें कानुंगो-अहवाल व हातमाग यापुरतीच आपली दृष्टि मर्यादित ठेवली आहे.

श्री. नित्यानंद कानुंगो यांच्या नेतृत्वाखालीं नऊ जणांच्या समितीनें आमच्या कापड – धंद्याची पहाणी केली आणि सरकारला रिपोर्ट पाठविला. समितीची नेमणूक झाली ता. २५ नोव्हें. १९५२ रोजीं. पहिली बैठक भरली जाने. १९५३ च्या सुरवातीस आणि रिपोर्टावर सह्या झाल्या ९ सप्टें. १९५४ ला. म्हणजे जवळ जवळ २१ महिने या समितीचें काम चाललें. या अवधींत ६३ ठिकाणीं दौरा काढून एकंदर ५८ साक्षीदारांमार्फत समितीनें माहिती मिळविली. आपली प्रश्नपत्रिका समितीनें हजारांवर लोकांकडे धाडली. पण उत्तरें मात्र फारच थोडक्यांनीं दिली.

या पूर्वीच्या कापड-धंदा-चौकशी-समित्या म्हणजे पूर्वीच्या टॅरिफ बोर्डाच्या; नंतर डॉ. पी. जे. टामस यांच्या अध्यक्षतेखालची ( स. १९४१ ची ) हातमागाबद्दलची. श्री. धरमसी खटाव यांनीं ( स. १९४५ मध्यें ) गिरणीधंद्याची चौकशी आरंभिली; सर अर्कॉट रामस्वामी मुदलियार यांनींहि सन १९५० मध्यें एक नवी चौकशी केली. एकूण अशा पुष्कळ समित्या होऊन गेल्या असल्या तरी कानुंगो-समितीचें वैशिष्ट्य हें कीं तिला ' पावरलूम ' संबंधीं चौकशी करावी लागली. पूर्वीच्या समित्यांपुढें

'पॉवरलूम'ची भानगड नव्हती.

अखिल-भारतीय स्वरूपाच्या चौकश्यांखेरीज महाराष्ट्रापुरत्या – कांहीं एक दोन जिल्ह्यांपुरत्या हातमागाविषयीं चौकश्या, 'अर्थशास्त्रीय पहाणी' असे आणखी प्रयत्न झालेले आहेत. इतर राज्यांतहि असेच चौकशीचे 'रपोट' उपलब्ध आहेत. त्या सर्वांचा साकल्यानें विचार करणें आवश्यक असलें तरी प्रस्तुत लेखाच्या मर्यादेपल्याडचें तें कार्य होय.

कानुंगो-समितीच्या अठ्ठेचाळीस-पानी रिपोर्टांत सुमारें दोनशें मुद्दे आले आहेत. हातमाग, पॉवरलूम व कापड-गिरण्या अशा तिन्ही व्यापक धंद्यांचा यांत विचार केलेला असला तरी त्यांत हातमागाचें वैशिष्ट्य काय, पॉवरलूमचा धंदा कां निघाला आणि सध्या त्या यांत्रिक धंद्याला एकदम काय 'रोग लागला' याचें निदानच आमच्या या कानुंगो-समितीला झालेलें दिसत नाहीं. आणि निदान बरोबर नाहीं मग चिकित्सा तरी अचूक कशी होणार ? शिवाय कापड-गिरण्यांच्या व्यापक धंद्याच्या पुनर्रचनेसाठीं काय उपाय योजावे यासंबंधींची कानुंगो-समितीची पहाणी अपुरी आहे. म्हणूनच कीं काय, या समितीच्या अहवालाला सरकारनें विशेष महत्त्व दिलेलें नाहीं.

कापड-गिरण्यांच्या केंद्राभोंवतींदेखील हातमागांची संख्या वाढत गेली, दिवसेंदिवस स्पर्धेंत टक्कर देऊन हा धंदा टिकून राहिला, हें आमच्या कानुंगो-समितीच्या नजरेस आलेलें दिसत नाहीं. मुंबई, सोलापूर, अहमदाबाद, नागपूर, ग्वाल्हेर, कानपूर, मद्रास, मदुरा, कोइमतूर अशा कितीतरी ठिकाणीं कापडगिरण्या वाढत गेल्या आणि हातमागहि वाढले. असा हा वरपांगीं विचित्र वाटणारा व्यवहार नीट समजला नाहीं तर हातमागांचें वैशिष्ट्य कळणार नाहीं. मग तो धंदा सुधारण्यासाठीं काय करावें हें कसें समजणार ?

कापडगिरण्यांनीं आपले माग वाढवूं नयेत ( छेदक १२० ), नवीन हातमाग घालण्यास कायद्यानें बंदी करावी ( छेदक १२८ ) अशा तऱ्हेच्या अव्यवहारी सूचना कानुंगो-समितीनें केल्या आहेत. गणितावर आणि आंकड्यांवर भलताच भर दिल्यामुळें या रिपोर्टांत अव्यवहारी विधानें पुष्कळ आलीं आहेत. सरकारला आपण सूचना केली कीं तीबरहुकूम सर्व योजना बिनबोभाटपणें, आपण कल्पिल्या तशा पार पडतात, त्यांत कसलाहि अडथळा येत नाहीं, असा एक जबरदस्त आशावाद समितीस वाटत असल्याचें पावलोंपावलीं दिसून येतें. सध्यांच्या मागांऐवजीं कापडगिरण्यांतून नव्या धर्तीचे, कमी देखरेख लागणारे ( ऑटोमॅटिक ) माग बसवावे कीं नाहीं याबद्दल वाद चालू असल्याचें व त्या निमित्तानें संप होत असल्याचें सर्वांस ठाऊक आहेच. कानुंगो-समितीनें तो प्रश्न चुटकीसरशीं सोडविला असून दरवर्षीं सुमारें पांच हजार याप्रमाणें वीस वर्षांत सर्व गिरण्यांत मिळून ऑटोमॅटिक यंत्र-माग सुरू करावे अशी हिशेबी शिफारस केली आहे. या एकंदर शिफारसींचा समग्र समाचार घेणें हा प्रस्तुत लेखाचा उद्देश नव्हे. हातमागांचें म्हणजे त्या धंद्याचें खरें दुखणें कोणतें हें त्या समितीलाहि उमगलें नसल्यामुळें त्याबद्दलचाच विशेष विचार येथें कर्तव्य आहे.

हातमागांचें पावरलूममध्यें रूपांतर व्हावें अशी समितीची स्पष्ट इच्छा दिसते ( छेदक ८१ ). म्हणजे हातमागाला कांहीं दिवसांनीं आमच्या देशांत थारा मिळूं नये अशी ही सोय आहे. हातमागाच्या कापडांत कुठलाच विशेष गुण नाहीं, बनारसी कलाबतूच्या आणि जरतारी कापडाखेरीज इतर कसलेंहि कापड त्यांवर विणण्यांत फायदा नाहीं, असें समितीचें स्पष्ट मत आहे ( छेदक ७३ ते ७५ ). आणि इतकें असूनहि समितीनें म्हटलें आहे कीं बारा लाख हातमाग सध्यां दरसाल १४० कोट वार कपडा तयार करीत आहेत आणि एकदोन वर्षांत त्यांवरील कपडा १६० कोट वारांवर जाईल. कारण हातमागांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे ( छेदक ८६ ). समितीची योजना अशी आहे कीं पंधरावीस वर्षांनंतर बारा लाखांपैकीं सुमारें अर्धा लाख हातमाग जुन्यापद्धतीचे रहातील. बाकीचे सर्व नव्या पद्धतीचे, यांत्रिक हातमाग किंवा पॉवरलूम हेच रूढ होतील ( छेदक ९० ).

समितीच्या शिफारसींचा विचार करण्यापूर्वी कांहीं गोष्टींचा खुलासा केला पाहिजे. शब्दांच्या व्याख्या ठरविल्या पाहिजेत. हातमागांचाच विचार प्रामुख्यानें करावयाचा असल्यानें त्या धंद्याची सद्यःस्थिति अभ्यासिणें जरूर आहे. हातमागाच्या कापडाचें वैशिष्ट्य काय आणि तें कां, हेंहि समजून घेणें जरूर आहे. ह्या धंद्याची सुधारणा कुणी कुणी








आणि कशी केली, तिची मर्यादा कोणती, म्हणजे समितीला वाटतें त्याप्रमाणें हातमागांचें पर्यवसान पॉवरलूममध्येंच व्हावयास हवें काय, -- या सर्व गोष्टींचा नीट विचार करावयाचा आहे.

अखिल भारतांत १२ लाख हातमाग असावेत असा अंदाज कानुंगो-समितीनें धरला आहे. आमच्या मुंबई राज्यांत स. १९५१ मध्यें एकूण १,३५,२१५ हातमाग होते. त्यांपैकीं —

८७२७१ ' धावता धोटा ' प्रकारचे;
२२७७१ ' फेंक – धोटा ' ,,
१२४७३ ' यांत्रिक ' हात ' माग
१२७०० ' सायकल ' माग
१,३५,२१५

अशी त्यांची विल्हेवारी[1] होती. म्हणजे 'फेंक' धोट्याचें ' धावतीकरण ' झपाट्यानें झालेलें दिसतें. यांत्रिक याचा अर्थ असा कीं कापड गुंडाळण्याची व्यवस्था यंत्रद्वारें होते. विणकराला वरची घडी चांगली विणून आंतील भाग कसा तरी भरकटून टाकण्याची संधि मिळत नाहीं. सर्व कापड एकसारखें विणलेलें असावें म्हणून यांत्रिक ' टेक अप् ' लावतात.

**पॉवरलूम** या शब्दाचा अर्थ मुद्दाम स्पष्ट केला पाहिजे. गिरण्यांत पॉवरलूमच चालू असतात. पण आमच्या कापडधंद्यांतले ' पॉवर-लूम-वाले ' हे ' न हिंदुर्न यवनः ' अशांपकीं आहेत. किंबहुना त्यांचें खरें स्वरूप लढाईमुळें, सूत-नियंत्रणामुळेंच उघडें झालें.– त्यांना तें लपवून ठेवावयाचें होतें असें वाटतें. गिरण्या व हातमाग यांच्यामधला हा पॉवर-लूम ( धंदेवाला ) आहे, तो दोन्ही डगरीवर हात ठेवून आपला तळीराम गार करूं पहाणारा वाटतो. बहुतेक पॉवरलूम्सवर ( विशेषतः इचलकरंजी, मालेगांव, भिवंडी, सांगली, सोलापुर, खंबायत येथें ) हातमागांचें वैशिष्ट्य असलेलें कापड काढतात – लुगडीं विणतात. बरींच वर्षें तीं हातमागांवरचींच लुगडीं आहेत असें भासवून – पॉवरलूमवर काढलेलीं आहेत असें स्पष्ट न सांगतां – गिऱ्हाईकांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न झाला. कित्येक व्यापाऱ्यांच्या मतें या प्रयत्नांत गैर असें कांहींच नाहीं. परंतु ' पॉवरलूम'ची ओळख करून घेतांना त्याचा हा गुण मुख्यत्वें लक्षांत घेतला पाहिजे, कीं धड हातमागहि नाहीं – धड गिरणीहि नाहीं, असा हा नवा प्रकार आहे.

हातमागांवरील विणकरांना संघटित करणें, त्यांच्याकडून लागेल तसा माल विणून घेणें हें कठिण होत गेल्यामुळें त्या विणकरांच्या ( नाकावर टिच्चून जसें कांहीं ) पोटावर पाय आणणारा हा पॉवरलूमचा धंदा हातमागांवरील कापड विकणारांनीं सुरूं केला.

सध्यां गिरण्यांत नव्या धर्तीचे माग आणवून एका मजुरांकरवीं ८, १६, ३२, ६४ माग चालविण्या- ( रॅशनलायजिंग ) ची योजना आहे, तशीच हातमागांविरुद्ध ही पॉवरलूमची नवी टूम होती. शिवाय प्रत्यक्ष राबणाऱ्यांना नवीं यंत्रें, नवीं साधनें देऊन मालाची पैदास वाढविण्याचा हेतु अशा धंदेवाइकांचा नव्हता. भांडवल मिळून त्यावर अधिकाधिक व्याज मिळविण्यासाठीं ही धडपड होती. विणकरांनीं हे पॉवरलूम्स विकत घेतले नसून कमिशनव्यवसायी लोकांनीं माग आपल्या मालकीचे ठेवून विणकरांना फक्त मजुरीचे धनी बनविण्यासाठीं केलेली ही कारवाई होय, ही बाब मुद्दाम लक्षांत ठेवली पाहिजे.

**हातमाग** या शब्दाची देखील व्याख्या नीट न केल्यामुळें त्या धंद्याला मिळणारें महत्त्व व सवलती इतरांना निष्कारण मिळतात. हातमागांचे प्रकार अनेक आहेत. त्यांत ' हातमागा 'ची यथार्थ व्याप्ति कुठें संपते, हें निश्चित ठरलें नाहीं – ठरविण्याचा कुणीं प्रयत्न केला नाहीं. कंबर-माग, फेंक-माग, धावता धोटा, फ्रेम-लूम, सायकल-लूम हे सर्व हातमागांचेच प्रकार. ' कंबर-माग ' हा अगदीं छोटा; विणण्याचें सूत ( = ताणा ) विणकर आपल्या कंबरेभोंवतीं गुंडाळतो म्हणून यास कंबर-माग म्हणतात. याचें दुसरें टोंक पसरलेल्या पायाच्या आंगठ्यास बांधतात – किंवा झाडाला – खांबाला हवें तसें अडकवात. छोट्या मोठ्या फिती नवारी या कंबर-पद्धतीनें विणतां येतात.

फेंक-माग हा खराखुरा हातमाग होय. यांतले बहुतेक सर्व सामान खेडोंपाडीं बनणारें असतें – एक माग दोनतीन पिढ्या सहज चालतो. खड्ड्यांत पाय सोडून विणकर बसतो व आडवा धागा ( = बाणा ) तो हातानें ( धोटा ) इकडून तिकडे – तिकडून इकडे ( = डावी-

१ ता. ११-३-५४ रोजीं श्री० मुरारजी देसाई यांच्या मुंबई नभोवाणीवरील भाषणांतून.






कडून उजवीकडे-उजवीकडून डावीकडे ) फेकून घालतो, म्हणून, यांस 'फेंक'-माग ( थ्रो-शटल् लूम ) म्हणतात. यालाच पिट्-लूम हें नांव आहे. कारण पाय सोडण्यासाठीं खड्डा आवश्यक असतो. असल्या मागांवर घोंगड्या-सतरंज्यापासून १००-१२० नंबरचें अत्यंत तलम सूत विणतां येतें. प्रत्येकाचीं साधनें त्या मानानें जाडीभरडीं किंवा नाजुक. परंतु सतरंजी विणणाराला धोतर विणतां यायचें नाहीं. प्रत्येक विणकराचें कार्यक्षेत्र ठराविक असतें. हें ठरतें सुताच्या नंबरावरून. दहा पौंड (रत्तल) वजन भरण्यास लागणाऱ्या सुताच्या लडीवरून सुताचा नंबर ठरतो. जितका नंबर कमी तितकें सूत अधिक जाड – आणि नंबर जितका जास्त तितकें सूत अधिक बारीक. सतरंजीचें ६ नंबरचें, तर तलम धोतरें-लुगडीं यांना लागणारें १०० – १२० नंबरचें असतें. ज्या विणकराला ३० – ४० नंबरचें सूत विणण्याची संवय त्याला अधिक जाडें अगर अधिक बारीक सूत विणतां येत नाहीं. त्याचा हात, त्याची नजर, नव्या कामासाठीं तितकीशी तयार नसते. बेबीमोटार चालविणारा आणि मोठी दुमजली बस चालविणारा यांत जसा फरक, तसाच बारीक सूत व जाडें सूत विणणारा यांच्या कामांत असतो. म्हणून सरकारी फर्मानें सोडून सतरंज्या विणणाराला धोतरें विणावयास लावतां येत नाहीं.

या कसबाखेरीज मागाची मर्यादाहि लक्षांत घ्यावी लागते. 'फेक-मागां'वर तयार होणारें कापड ( 'अडीच हात' ) ४५ – ४८ इंचांपेक्षां अधिक रुंद असायचें नाहीं. बैठ्या विणकराच्या 'पसरलेल्या' दोन्ही हातांमधलें तें सोईस्कर अंतर होय. पठाणी बांध्याच्या विणकराचा 'पन्ना' अधिक रुंद होईल. पण असले घरगुती हातमाग 'घरांतील' सर्व मंडळींना चालवायला येण्याजोगे असल्यानें – आळीपाळीनें कुणीहि त्यावर विणीत असल्यानें – त्यांची रुंदी मर्यादित असते.

धांवता धोटा हिकमतीनें म्हणजे दोरीच्या हिसक्या-मुळें इकडून तिकडे धावतो. 'हात-फेकी' पेक्षां त्यांची फेक अधिक रुंद व वेगहि थोडा अधिक. म्हणून धावत्या धोट्याच्या मागावर ५०–५६ इंच ( कधीं कधीं ६० इंचापर्यंत ) रुंदीचें कापड काढण्यास अडचण पडत नाहीं.

अशा हातमागावर विणून तयार होणारें कापड पॉवरलूमच्या मानानें सावकाश होतें. गिरणींत असतात तसे लोखंडी पॉवरलूम, यांत्रिक शक्तीनें, विजेनें, चालतात. त्यांचा वेगहि अधिक असतो. धावत्या धोट्याच्या हातमागावर रोज ८–९ वार कापड निघतें. तेवढ्याच वेळांत, तसलेंच कापड, थोड्याफार 'चलाखी'नें, पॉवरलूमवर अडीच ते तीनपट चौपटहि निघतें. म्हणून पॉवरलूमवर इतकी अधिक उडी !

परंतु हातमागावरील कापडाची सर पॉवरलूमच्या कापडास येत नाहीं. कापडाचा मुख्य गुण टिकाऊपणा. तो अवलंबून असतो सुताच्या चांगले – वाईटपणांवर. याखेरीज सूत ( व प्रसंगविशेषीं कापडहि ) विणण्यापूर्वी व विणतांना कांहीं दिव्यांतून पार पडत असतें. गरम उकळत्या 'कांजी'त बुडी, तापलेल्या पत्र्यावरून प्रवास, लोखंडी सामानाशीं झपाट्यानें टक्कर या क्रिया गिरणींत व पॉवरलूम वरील सुताच्या नशिबीं येतात. त्यांतील एकाददुसरी पिळदार ( डबल ) सूत वापरून टाळतां येत असली तरी लोखंडी मागावर एकंदरीनें सुताचा चांगलाच 'पिट्टा' पडतो. आणि म्हणून कापड कमताकद बनतें. लाकडी हातमागावरील सुतावर घडणारे संस्कार मामुली पद्धतीनें होत असल्यानें, तें अधिक मजबूत रहातें, कापड अधिक टिकाऊ बनतें. हा बनावटींतला फरक ध्यानांत घेतल्याखेरीज हातमाग – पॉवरलूम – गिरणी या तिरंगी लढ्याचें स्वरूप नीट उमगणार नाहीं.

पॉवरलूममध्यें सर्वच क्रिया यांत्रिक पद्धतीनें होत असल्यानें पोत सारखें ठेवतां येतें. हातमागांवरील कापडांत वैयक्तिक लहरीवर अधिक भर असल्यानें लबाडीला वाव मिळतो. 'दिखाऊ' भाग ( वरची घडी ) चांगला, 'आंतली घडी' नुसती वेठ मारून काढलेली, असा प्रकार हातमागांवरील कापडांत होतो. पॉवरलूमवरहि तशी चलाखी करतां येते. पण तुलने-साठीं हे अपवादात्मक प्रकार जमेस धरून चालणार नाहीं.

अलीकडे शास्त्रशुद्ध पद्धतीनें कपडे धुण्याबद्दल कटाक्ष दिसून येतो. धुण्यांत तें कसलें आलें आहे शास्त्र, अशी शंका काढण्याचें प्रयोजन नाहीं. कपडे जोरानें ( किंवा मुळींच ) आपटूं नयेत; लाकडी टोकल्यानें ते बडवूं नयेत; भर उन्हांत वाळवूं







नयेत; फार जोरानें पिळूं नयेत; – अशा पुष्कळ सूचना देतात. अशानें धागा तुटतो, कपडा लवकर फाटतो असें सांगतात. हें सर्व खरें तर गिरण्यांतील क्रिया, विशेषतः 'साइझिंग' व प्रत्यक्ष विणणें – यांमुळें धागा किती दुर्बळ बनत असावा हें काय सांगावयास पाहिजे ? कपडा तयार झाल्यानंतर धुलाई-सफेदाईच्या निमित्तानेंहि फिरून उकळत्या पाण्याची व जहाल रसायनाची आंघोळ त्याला करावी लागते. ह्यांहिमुळें कपडा हमखास कमताकद बनतो.

पण तो तसा दिसूं नये, कापड भपकेदार वाटावें, 'वजनदार' ठरावें म्हणून अनेक सोपस्कार त्यावर गिरण्यांत करतात. रसायनें (ब्लीचिंग पावडर) वापरून तें दुग्धधवल बनवितात. त्याची 'चकाकी' व वजन वाढविण्यासाठीं माती व मेण (– चायना क्ले, पॅरॅफिन वॅक्स, मटन-टॅलो इत्यादिकांचा कापड-धंद्यांत संबंध कां व कसा येतो, हा विचार येथें कर्तव्य नाहीं– ) हे पदार्थ घोटून बसवितात आणि ह्या सर्व क्रिया पुन्हां उकळत्या पाण्यांतून आणि वाफेच्या साहाय्यानें होत असल्यानें पुन्हां कापड दुबळें बनतें. वापरलेलें रसायन थोडें अधिक प्रमाणांत पडलें किंवा कापड त्यांत थोडा अधिक वेळ राहिलें तर तें जीर्णप्राय बनतें. म्हणून गिरणीचा कपडा धुतल्यावर पुष्कळदां विरविरीत होतो, हातमागाचा कपडा 'भरतो,' तसा भरत नाहीं आणि पुष्कळदां तो फारसा टिकतहि नाहीं. कांहीं ख्यातनाम गिरण्यांच्या ठराविक प्रकारांखेरीज इतर कापड घेण्यांत धोका असतो तो हा : कापड आकसणें, विरविरीत होणें आणि लवकर फाटणें. आमचा गिरणी-कापडाचा परदेशाशीं झालेला व्यापार अभ्यासिला म्हणजे ह्या विधानाची सत्यता पुरेपूर पटेल. प्रथम गिरणीवाल्यांची लबाडी आणि नंतर तें कापड परदेशीं रवाना करणाऱ्या व्यापाऱ्यांची – अशा दुहेरी बनवेगिरीमुळें आमची बदनामी चालली आहे.

हातमागाच्या कपड्याचें वैशिष्ट्य काबीज करण्याची धडपड आजवर अनेकांनीं, देशी-परदेशी कारखानदारांनीं केली. पण नकली, तकलुपी माल बाजारांत रूढ करण्यापलीकडे कुणाला फारसें यश लाभलेलें नाहीं. व्हिक्टोरिया राणीच्या अमदानींत लंडनमध्यें साम्राज्यांतील कलाकौशल्याचें प्रदर्शन भरलें होतें. तेव्हांपासून भारतीय हातमागांच्या कारागिरीकडे यांत्रिक कारखानदारांची विशेष नजर वळली. नागपुरी करवतकांठी (रुईफुली) धोतरजोडे, उपरणीं तयार करण्यासाठीं जर्मनीनें केलेल्या प्रयत्नांची आम्हांस माहिती आहे. ती योजना अशी होती कीं एकाचवेळीं ८, १२, १६ फिती (नवारी) विणतात तशा, किनारी तेवढ्या वेगळ्या वेगळ्या पण एकाच वेळीं विणून घ्यावयाच्या. आणि अशा तयार झालेल्या किनारी मलमलीला जोडून धोतरें अगर उपरणीं पाहिजे तशीं तयार करायचीं. परंतु यांतहि हातमागांच्या नाजुक कारागिरीचें आणि टिकाऊपणाच्या तंत्राचें संपूर्ण अवधान राखलें होतें. किनारी एकदम विणणारा हा अजस्र माग लांकडी होता व त्याचा वेगहि हातमागासारखा मर्यादित ठेवला होता.

हल्लींसुद्धां सुरतेकडे जरी-किनारी वेगळ्या बनवितात आणि त्या निरनिराळ्या पातळांना, लुगड्यांना हव्या तशा हातानें लावून घेण्याची पद्धत पुष्कळ समाजांत रूढ आहे. हातमागांवरील कापड बव्हंशीं स्त्रियांसाठीं लागणारें – लुगडीं, खण, शेले, शालू, पैठण्या इत्यादि – आहे. त्या कापडाची नीट पहाणी केल्यास असें आढळून येईल कीं गिरण्या अगर पावरलूमवाले छोटे कारखानदार फार तर हातमागवाल्यांना बेकार करतील – त्यांचा धंदा बुडवितील. परंतु हातमागावरील कापडाचें हुन्नरी कसब, त्या कापडाची नाजुक विणकर आणि एकंदर टिकाऊपणा इतर कुठल्याच मागाला कदापि साधणारा नाहीं.

हातमाग-विणकर तगून राहिला आहे, त्याचीं कारणें फार निराळीं आहेत. एकीकडे गिरण्यांचा व्याप वाढत असतां, हातमागांवर निघणाऱ्या कापडासारखें कापड भराभर गिरण्या बनवीत असतां, ऐन गिरण्यांच्या गांवींच इतके हातमाग चालूं का रहातात ?

दुसराहि विचार असा कीं, भरमसाट सावकारी पिळणूक सहन करून देखील हातमागांचा धंदा सफाई बुडाला नाहीं, तो कां ? विणकराला माल द्यावयाचा, त्यावर भरपूर नफा आकारून, त्याची किंमत 'कर्ज' समजावयाची; फक्त 'एक आणा' व्याज (= दरमहा दर रुपयास एक आणा = ७५ टक्के !) आकारण्याची साधी भाषा बोलावयाची; तयार झालेला माल पुनः त्याच








सावकारानें पडत्या भावानें विकत घ्यावयाचा – विकून दिल्याबद्दल अडत कापून घ्यायची – आणि सर्व रक्कम फक्त व्याजाची फेड करण्यासाठीं जमा धरायची; मुद्दल नेहमीं कायम ठेवावयाचें. असली जीवनशोषक अर्थ-व्यवस्था असूनहि हातमाग देशभर चालू राहिले यांतलें मर्म समजून घेण्याचा प्रयत्न कानुंगो-समितीनें केलेला दिसत नाहीं.

बायकी पोषाखांत – लुगड्या-खणांत – हवी असलेली विविधता, कांठ, पदर व वाण यांचे निरनिराळे प्रकार हातमागावर अधिक शक्य आहेत. फेक-धोटा किंवा धावता धोटा चालविणारे माग एका वेळीं १८-२० वारांचें सूत घेतात. एका वेळीं नऊवारी दोन लुगडीं (१६ हात लांबीचीं) अगर सहावारी तीन अशा प्रकारें त्यांचें काम चालतें. इतर कुठलेहि माग घेतले कीं निदान एका वेळीं निदान २०० वार (कापडाचें) सूत वापरावें लागतें. म्हणजे यांत्रिक मागांचें काम झपाट्यानें होतें म्हणून त्यांच्यांत विविधता फार कमी. एकाच प्रकारचा कपडा विणण्याची सक्ती त्यांजवर होते. तशी हातमागांवर नसते. शिवाय हातमागांचें काम करणारा जातीचा विणकर असल्यानें ताणा तोंच असला तरी बाणा बदलून, पदरांत निराळी पद्धत स्वीकारुन किनारीच्या तारा त्याच ठेवून, वीण बदलून, तऱ्हतऱ्हा साधणें त्याच्या हातीं असतें, त्याला तें सहज साधतां येतें.

या उलट, यंत्रमागावरील विणकर हा कुणातरी धंदेवाईकाचा धंदा नोकर असतो. यांत्रिक माग घेणें त्याला परवडत नाहीं. मागाचा वाढता आहार – त्याला सूत वगैरेहि इतकें झपाट्यानें पुरविण्यासाठीं लागणारें भांडवल त्याच्या ऐपतीपल्याडचें असतें. शिवाय दिवसेंदिवस तो कारागीर न रहातां केवळ मजूरदार बनत चालल्यानें, हातमाग-विणकरांचें कसबकौशल्य त्याच्यांत उरतच नाहीं!

गिरण्या आणि हातमाग हे वास्तविक पूरक धंदे. गिरण्यांतील सुताला गिऱ्हाईक हातमागांचे विणकर. या विणकरांना लागणारा कच्चा माल मिळतो गिरण्यांतून. कांहीं वर्षें तलम सूत अवघें विलायती येत असे. जपानी व ब्रिटिश गिरणीवाले ही हातमागांची गरज ओळखून त्यांचेसाठीं मुद्दाम सूत-पुरवठा सोईस्कर रीतीनें करीत. परंतु दुसऱ्या महायुद्धामुळें ही परिस्थिति पार बदलली. बहुतेक सर्व सूत-पुरवठा देशी गिरण्यांतूनच होऊं लागला. मात्र हें सूत दुसऱ्या एका घरगुती धंद्यासाठीं लागणारा कच्चा माल आहे, तें माफक दरानें पुरविलें पाहिजे ही जाणीव आमच्या बनियांना कशी असणार? पण महदाश्चर्य हें कीं कानुंगो-समिति देखील या बाबतींत अत्यंत असहायपणाचे उद्गार काढते: "गिरण्यांनीं हातमागांस सूत माफक दरानें पुरवावे, अशी योजना करतां येणार नाहीं" (छेदक १०३). ही तिची कबुली दुर्बलतेची समजावी कां अज्ञानाची?

गिरण्यांना संरक्षण देऊन, त्यांना धंदा करायला सर्व प्रकारें सवलत देऊन, कापड-निर्यातीची खास सोय करूनहि सरकारचें एवढें सरळ सांगणें ऐकण्याची गिरणीवाल्यांची तयारी नसेल असें आम्हांस वाटत नाहीं. त्यांची तयारी नसली तरी त्यांना राष्ट्रहितार्थ तसें करावयास लावलें पाहिजे. पण देशभरच्या कापड-धंद्याची पहाणी करणारी कानुंगो-समिति गिरण्यांना असें सांगण्यासहि धजत नाहीं, याचें महदाश्चर्य वाटतें! सरकारला एवढाहि अधिकार असूं नये?

या बाबतींत लक्षांत घेण्याची गोष्ट ही कीं केवळ हातमागांना सूत पुरविणाऱ्या अनेक गिरण्या सध्यां चालू असून त्यांत विणकाम मुळींच होत नाहीं. नुसतें सूत कातून, तें हातमागवाल्यांना विकून अशा गिरण्यांनीं भरपूर नफा कमावला आहे. यांत अस्सल विलायती कंपन्याहि कांहीं आहेत. अशा गिरण्यांवर साधें व्यवहारी नियंत्रण घालण्याची शिफारस करण्यास कानुंगो-समिति कचरते हें अजब आहे!

हातमागांबाबत धोरण सरकारनें व लोकांनींहि काय ठेवावें, याबाबत विवेचन असें:

१ 'हातमाग' हा घरगुती धंदा, वैयक्तिक हुन्नर, म्हणून टिकविण्याची आवश्यकता आहे. घरगुती धंदा याचा अर्थ विणकर हातमागाचा मालक असून त्याच्या कुटुंबांतील मंडळी त्यासाठीं लागणारीं पोटकामें करतात.

२ फेक-माग व धावता धोटा याव्यतिरिक्त हातमागांची सवलत "कारखानदारी हातमागांना" लागूं करूं नये. हातमागांवरील कापड-विक्रीवर मिळणाऱ्या सवलती मोठमोठ्या कारखानदारांना किंवा यांत्रिक माग,

सायकल-लूम अशांना मिळूं लागल्यास आजचा स्वतंत्र विणकर उद्यां केवळ मजूरीचा मालक होईल. घरगुती धंदा बुडेल – त्याचें कसब नष्ट होईल.

३ हातमागांचें पर्यवसान अधिक सुधारलेल्या यंत्रांत झालेंच पाहिजे हा भ्रामक आग्रह नसावा. सुमारें शंभर वर्षे गिरण्यांशीं टक्कर देऊन ( 'तुल्य-बल' नसतांहि ) भारतीय हातमाग टिकून राहिले आहेत – ते टिकून रहाणार आहेत, हें लक्षांत घ्यावें. हातमागावरील विणकराची प्रगति इतर विणकरांवर हुकमत चालविण्यांत ( स्वतः छोटा कारखानदार बनण्यांत ) अगर यांत्रिक माग–गिरण्यांतील लोखंडी माग–चालविणारा बनण्यांत नाहीं.

४ सध्यां सरकारी – निमसरकारी दुकानांत हातमागाचें कापड विकतात; त्यांतील खुद्द विणकरांच्या हातांत किती रक्कम पडते हें तपासावें. विक्रीपैकीं बव्हंश विणकराला मिळावा. मधले दलाल त्या व्यवहारांत नसावे. ( निदान एकाद-दुसराच असावा, आणि त्याची दलाली 'माफक' ठरलेली असावी. ) अशी व्यवस्था केल्यास हातमागांना भरपूर उत्तेजन मिळेल. सध्यांच्या व्यवस्थेनुसार दलालीलाच भरपूर उत्तेजन मिळतें. राबण्याचा व अर्धपोटी रहाण्याचा विणकरांचा 'हक्क' तेवढा कायम आहे ! 'कसणाराची जमीन' या न्यायानें विणकराला त्याच्या उत्पादनापैकीं रास्त हिस्सा मिळाला पाहिजे. थोडक्यांत, मधले 'दलाल' नाहींसे झाले पाहिजेत.

५ घरगुती धंदा असल्यानें, घरांतल्या सर्व मंडळींना त्यांत भाग घेता येतो, म्हणून तो टिकविणें अत्यावश्यक आहे. नाहींतर इतकीं सगळीं माणसें 'बेकार' बनतील. त्यांची राबण्याची तयारी असूनहि, त्यांच्या अंगीं कसब असून देखील त्यांना देशाच्या उत्पादनांत भर घालतां येणार नाहीं. असें होऊं नये म्हणून ह्या धंद्याचें स्वरूपहि बदलून चालणार नाहीं. परंतु या धंद्याचा व्याप = खरेदी विक्री – भांडवल पुरवठा = सहकारी तत्त्वानुसार चालावा, वाढावा म्हणून करावयाची ती व्यवस्था सरकारनें करावी.

६ यांत्रिक सुधारणा सुचवून हातमाग अधिक कार्यक्षम करण्याच्या प्रयत्नानें विणकराचें कसब हळूहळू नाहींसें होईल. तो नांवाचा 'विणकर' राहील; त्याची वैयक्तिक हुन्नर, कारागिरी नष्ट करण्याचा कुठलाहि प्रयत्न होऊं नये. 'जयपुरी', 'कांगडा', 'मुगल' अशा धर्तीच्या जुन्या चित्रकाराला बिनत्रासाचा अद्ययावत् 'कॅमेरा' वापरावयास लावण्याचा अट्टहास आणि हातमाग-विणकराला यांत्रिक मागाचा उपयोग करावयास भाग पाडणें हे एकाच प्रकारचे प्रयत्न समजावेत.

७ गिरण्या, पॉवरलूम किंवा तसलेच संघटित कारखानदार यांची तरफदारी करण्यासाठीं, त्यांचें हितरक्षण करण्यासाठीं इतरांची गरज नाहीं. ते स्वतः समर्थ आहेत. परंतु हातमागांचा धंदा स्वाभाविकपणेंच संघटित न होणारा असल्यानें, अज्ञानाप्रमाणें त्याचें संगोपन करण्याची जबाबदारी सरकारावर पडते. तशी ती कायमची पडेल. म्हणून संघटित धंदेवाईकांपासून हातमागांचें संरक्षण हें **पहिलं संरक्षण** त्या कारागिरांना हवें.

८ **दुसरें संरक्षण**, कच्च्या मालाचा रास्त किंमतींत भरपूर पुरवठा. युद्धकालीं सुताच्या टंचाईमुळें हातमागांवर आपत्ती कोसळल्या तशा पुनः कोसळूं देऊं नये. यांतच **चांगला** कच्चा माल अभिप्रेत आहे. कुजकें, कमताकद सूत, कच्च्या रंगाचें सूत – अशी फसवेगिरी विणकराची झाली नाहीं तर तो कच्च्या रंगाचें अगर कुजकें कापड काढील कसा ? याबाबत खबरदारी घेणें सरकारच्या हातीं आहे. खाद्य पदार्थांत, औषधांत किंवा उपयुक्त पदार्थांत 'भेसळ' होऊं नये, खोटें वजनमाप दुकानदारांनीं वापरूं नये अशी व्यवस्था करणें सरकारच्या हातीं आहे. मग हातमागाबाबतची तेवढी जबाबदारी कशी टाळतां येईल ? विलायतेस कापूस निर्यात होत असे तेव्हां मापांत लबाडी, कापसाच्या जातींतली भेसळ वगैरे अप-प्रकारांना कायद्यानें बंदी करतां आली. मग हातमागासाठीं चांगलें, पक्क्या रंगाचें सूत माफक किंमतींत मिळण्याची सोय करणें अवघड नाहीं.

९ **तिसरें संरक्षण** सावकारी पाशांपासूनचें हवें. विणकराला लागणारें भांडवल माफक दरानें मिळालें पाहिजे. त्यानें तयार केलेला माल जास्तींत जास्त दरानें ( दलाली टाळून ) विकून त्यांपैकीं जास्तींत जास्त हिस्सा विणकराच्या पदरीं पडला पाहिजे.

१० आणखीहि एका बाबतींत सरकारी **संरक्षणाची** जरूरी आहे. हातमागाचा माल हातमागाचाच म्हणून








विकावा. गिरण्या व पॉवरलूम यांचें कापड हातमागावरील आहे, असें भासविण्याची हल्लीं फार संवय दुकानदारांस आहे. तिजविरुद्ध संरक्षण हवें. औषधें कशाचीं बनविलीं आहेत, सरबतें खरोखर फळांपासून बनविलीं आहेत कीं 'बनावट' ( = नकली, कृत्रिम ) आहेत, हें स्पष्टपणें जाहीर करण्याची सक्ती सरकारनें केलीच आहे. माल देशी कीं विलायती, हें जाहीर करण्याबद्दलहि सरकारचा निर्बंध असतो. तसा हातमागांबाबत असावा. इतर कारखानदारांना हातमागांत 'घुसण्याची' सवड ठेवूं नये, हातमागाचा लाभ त्यांना मिळूं नये, केवळ हातमागवाल्यांनाच मिळावा, एवढी मागणी.

आधुनिकीकरणाच्या हव्यासामुळें भलत्याच सुधारणा हातमाग चालविणारांवर लादूं नयेत. सुधारणा, यांत्रिक लाभ, कांहींहि असो, तो विणकरांना आपल्या पैशांतून घेतां आला पाहिजे; त्यांच्या मालकीचें तें साधन असलें पाहिजे; त्यासाठीं 'कर्ज' काढावें लागूं नये. हातमागाचें वैशिष्ट्य कायम राहील अशी व्यवस्था व्हावी:

१ लाकडी मर्यादित वेगानें चालणारा माग.

२ मागाची मालकी – विणकराची – राबणाराची.

३ कौटुंबिक मंडळींचें – मुलाबाळांचें, बायकांचें, म्हाताऱ्यांचें त्यांत सहकार्य लाभण्याची सोय.

४ विणकर राहतो तिथल्या तिथें सर्व सामान मिळण्याची व्यवस्था. –

– या बाबी सांभाळणें अत्यावश्यक आहे.

अलीकडे 'हँडलूम-बोर्ड' किंवा अशाच सरकारी निमसरकारी संस्था हातमागांचें 'यंत्रीकरण' झपाट्यानें करण्यासाठीं झटत आहेत. यांत्रिक 'टेक-अप', लोखंडी 'फणी', मेणवलेली 'वई', डॉबी, जॅकार्ड इत्यादिकांचा आग्रह त्यांच्या फर्मानांत असतो; रिपोर्टांतहि त्यांचा उच्चार पुष्कळदां आढळतो. 'ताणा' करण्याचीं (वार्पिंग) यंत्रें. पांजणी-(साइझिंग)-साठीं यांत्रिक व्यवस्था, सफाई-( फिनिशिंग )चीं यंत्रें – असा यांत्रिक सुधारणांचा लकडा हातमागवाल्यांच्या मागें लावण्याची रीत आहे. त्याचप्रमाणें विणकरांच्या सहकारी सोसायट्यांनीं 'सूत' कातण्याच्या छोट्या छोट्या 'गिरण्या' चालवाव्या अशीहि योजना कित्येक ठिकाणीं पुढें दामटली असल्याचें समजतें. कानुंगो-समितीला तर तिचा 'मोह' पडला. परंतु या सर्व सुधारकांची दृष्टि निराळी दिसते. हातमागांचें घरगुती- (–विणकरानें आपल्या राहत्या 'खोपटां'त बसून विणावयाचें–) स्वरूप बदलून त्या ठिकाणीं छोटा कारखाना, नंतर मोठा, पुढें छोटी गिरणी – असें सारखें बदलतें व वाढतें स्वरूप त्यांना अभिप्रेत असावें. आमच्या दृष्टीनें हें चूक आहे. हातमागांचा धंदा टिकला पाहिजे; सर्व कुटुंबीयांना त्यांत फावल्या वेळीं काम मिळणें जरूर आहे. प्रगतीचा, सुधारणेचा, यांत्रिक व्यवस्थेचा व हितकर कायद्यांचा फायदा विणकरांस द्यायचा असेल तर तो कच्चा माल पुरविण्यांत आणि तयार मालाचा उठाव करण्यापुरताच मर्यादित असावा – हातमांगाच्या रचनेंत नसावा – हा आग्रह आहे.

अशानें विणकर आपण होऊन सुधारणा करूं लागेल. जशी झेपेल, परवडेल अशीच नवी नवलाई तो पत्करील. मात्र 'छोटा' कारखानदार होण्याचा त्याचा मोह टाळणें आवश्यक आहे. उत्क्रांतिवाद, सतत प्रगतीचा ध्यास हातमागांना लागू नाहीं. – तो त्यांजवर लादूं नये, एवढेंच सांगणें.

---

## आकाशाच्या मनांतलें !

आकाशाच्या मनांतलें
हळूं खालीं उतरलें
रंगाळत निसटलें.

निसटलें खालीं जें, तें
मुग्ध कळीला गावलें
स्मितांतून प्रकटलें.

प्रगटलें, मरुतानें
सारसर्वस्व लुटलें
आकाशाला सांगितलें.

— गणेश कुडे








एक रूपककथा : प्रा. माधव मनोहर

# कुंपणाच्या पलीकडे—!

मी धांवत होतों. ताशीं पंचवीस मैलांची नोंद स्पीडॉमीटर करीत होता. मी एकसारखा धांवत होतों. सतत धांवत असतांना मध्येंच एकदम अकारण थांबणं, हा नैतिक गुन्हा आहे हें मलाहि समजत होतं. पण माझ्या पायांतच कांहीं त्राण राहिलेलं नव्हतं, त्याला मी तरी काय करणार ? मी तर आतां इतका थकून गेलों होतों कीं शेवटीं मला थांबावंच लागलं. पावलांनींच चालण्याचं काम नाकारल्यावर थांबणं भागच होतं. शेवटीं हाश् हुश् करीत एका मैलाच्या दगडावर मी आसन ठोकलं. माझ्यामागून धांवत येणारे लोक आतां माझ्यापुढून पुढें धांवत जातांना मला दिसत होते. जातां जातां त्यांतले कोणी दांत विचकून माझा उपहास करीत होते. तरी सुद्धां मी तसाच निर्लज्जपणानं जागच्या जागीं खिळल्यासारखा बसून होतों. निर्लज्जपणानं म्हटलं खरं, पण खरं म्हणचे माझी मलाच लाज वाटत होती. मागून धांवत येणाऱ्या एका व्यक्तीकडे माझं लक्ष गेलं. अन् मग मात्र मी ताडकन् उठून उभा राहिलों. डॉ. कु. मुमताज रामदास होती ती. शिक्षणशास्त्रांत तिचा अधिकार फार मोठा होता. माझ्या पुढ्यांतून भर वेगांत ती धांवत गेली. जातां जातां मला पण पाय उचलण्यासाठीं तिनं हातांनीं खूण केली. पण मी नुसतां हंसलों आणि किंचित् वर उचललेली हॅट पुन्हां डोक्यावर थापून मी परत त्या मैलाच्या दगडावर आसन ठोंकलं.

माझी अवस्था काय होणार आहे, माझं मलाच कळेना. माझ्या भावासारखं तर माझं होणार नाहीं ना ? दोन वर्षंच झालीं त्या गोष्टीला. रस्त्याच्या कडेला त्याला तसाच सोडून मी त्याचा निरोप घेतला होता. बिचारा ! आपल्या श्वासाची सारी शक्ति विनाकारण गाण्यांत त्यानं खर्चीं घातली होती आणि हातापायांचं बळ दुसऱ्यांच्या कारणीं लावलं होतं. याचा परिणाम व्हायचा तोच झाला. धांवण्याच्या श्रमानं तो उरीं फुटला अन् त्याच्या रक्ताच्या गुळण्यांनीं पायांखालचा निर्दय रस्ता लाल झाला. पण मी त्याच्यापेक्षां शहाणा होतों. आतांपर्यंत शरीराची सारी शक्ति मी माझ्या पायांसाठींच राखून ठेवली होती. आणि म्हणून तर इथवर कसाबसा मी येऊन पोंचलों होतों. पण आतां पायांखालचा कॉंक्रीटचा रस्ता मला कंटाळवाणा वाटायला लागला होता.— आजुबाजूची सारी धूळ त्या रस्त्यावर सांचलेली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पुरुषभर उंचीचीं अखंड कुंपणं होतीं. त्यामुळें दोन्ही बाजूंचं कांहींच दिसत नव्हतं. डोळ्यांवर ढापण्या बांधलेल्या घोड्यासारखा त्या सरळसोट सडकेवरून मी एकसारखा धांवतच होतों. आठवतं तेव्हांपासून हा असाच धांवत होतों !

आणि वाटेनं कितीतरी वस्तू मी रस्त्यांत टाकून दिल्या होत्या. खरं सांगायचं म्हणजे आम्ही टाकून दिलेल्या वस्तूंनीं मागचा सारा रस्ता भरून गेला होता. अनेक वर्षांची धूळ त्या वस्तूंवर आतां सांठलेली असेल आणि रस्त्यांतल्या लहानमोठ्या दगडांसारख्याच त्या साऱ्या वस्तू आतां दिसत असतील. माझी सारीं गात्रं आतां इतकीं थकून गेली होतीं कीं जवळ असलेल्या वस्तूंचं ओझं सुद्धां मला असह्य वाटायला लागलं होतं. त्या मैलाच्या दगडावर सुद्धां नेट धरून मी फार वेळ बसूं शकलों नाहीं. थोड्या वेळानं त्या दगडावरून माझं शरीर घसरलं आणि खालच्या रस्त्यांवर कोसळलं. पडलों त्यावेळीं माझं तोंड कुंपणाच्या बाजूला होतं. आणि मनांत मी करुणा भाकीत होतों कीं आतां इथंच या भागलेल्या देहाला कायमची विश्रांति मिळावी.

तेवढ्यांत कुठून तरी वाऱ्याची झुळूक आली आणि मी शुद्धीवर आलों. वर मान करून पाहिलं तर कुंपणांतल्या पानां-फांद्यांतून उजेड झिरपत होता. — आणि वारा पण ! — कुंपण कांहीं फारसं मजबूत दिसलं नाहीं. माझ्या गात्रांतली सारी शक्ति आतां संपुष्टांत आली होती. तरीसुद्धां वाटलं कीं या कुंपणाच्या जाळक्यांतून एकदां पलीकडे जावं आणि कुंपणापलीकडे काय आहे, तें एकदां डोळ्यांनीं पहावं. मनांत हा चोरटा विचार यायचा अवकाश, चोरटेपणानं मी एकदां रस्त्याची चाहुल घेतली. दोन्ही बाजूंना नजर पोंचत होती तिथपर्यंत कोणीसुद्धां धांवतांना दिसत नव्हतं. नाहींतरी मनांत आलेला विचार कृतींत उतरवण्याची माझी ताकद नव्हती. पण क्षणभर रस्ता निर्मनुष्य दिसला आणि कधीं मनांत येऊं नये अशा त्या









विचाराच्या मी अधीन झालों. कारण त्या रस्त्यानं धांवणारीं आम्ही जीं माणसं होतों, तीं चुकून कधीं एकमेकांशीं बोलत नसूं. आणि चुकून कधीं बोललोंच, तर त्या कुंपणापलीकडे कांहीं असूं शकेल, असल्या प्रकारचा अविचारी संशय आमच्या कोणाच्याच मनांत कधीं नव्हता. पायांखालचा रस्ता सत्य होता. दोन्ही बाजूंच्या कुंपणांपलीकडे जें कांहीं असण्याची शक्यता होती, तें सारं सर्वथा मिथ्या होतं.

तें कांहीं असो, त्या क्षणाच्या मोहाला बळी पडलों, ही गोष्ट मात्र खरी. माझ्या पापशंकी मनाला मी दिलासा दिला कीं 'अरे, त्यांत काय आहे मोठंसं? क्षणभरांत आपण परत येऊं' तसाच सरपटत मी कुंपणाजवळ गेलों. तर कपाळावर, गालांवर, मानेवर कांट्यांचे ओरखडे उमटले. शेवटीं माझ्या हातांचा मी ढालीसारखा उपयोग केला आणि पावलांचा नेट देऊन मी जोरांत पुढें घुसलों. आतां माझी अवस्था त्रिशंकूसारखी झाली होती. कुंपणाच्या ना आंत ना बाहेर! डोकं कुंपणाच्या पलीकडे सटकलं होतं. तर पावलं अजून रस्त्यालाच चिकटलेलीं होतीं. त्या एका क्षणांत मन द्विधा झालं. वाटलं कीं हा मोह आवरावा आणि परत फिरावं. त्या धडपडींत माझ्या अंगावरचे सारे कपडे फाटले होते. आणि आजवर मोठ्या परिश्रमानें बाळगलेल्या वस्तू मागच्यामागें रस्त्यात सांडून घरंगळल्या होत्या. त्या जाळक्यांत मी आतां असा कांहीं रुतून बसलों होतों कीं मागें वळणं आतां अशक्यच होतं. आणि आंधळे-पणानं पुढें सरण्याखेरीज दुसरी गति नव्हती. क्षणा-क्षणाला वाटत होतं कीं सारी शक्तीच शरीराला सोडून जाईल, आणि माझा निर्जीव देह त्या पाला-पाचोळयांत सडत पडेल.

आणि एकदम एक चमत्कार घडला! माझ्या डोक्यावरून थंडगार पाण्याचा प्रवाह धो धो वहात गेला. वाटलं कीं आतां बुडत बुडत त्या अथांग पाण्याच्या तळाशीं जातों आहे! प्रत्यक्ष काय घडलं, तें मागाहून उमजलं. त्या कुंपणांतून मी जों सटकलों, तो सरळ पलीकडच्या खोल पाण्याच्या डोहांत अवचित पडलों. नाकांतोंडांत पाणी गेलं. आणि मी खालीं खालीं जायला लागलों. मोठ्या कष्टा-नेंच प्रयत्न करून मी पाण्यांतून वर डोकं काढलं. आणि एकदम जीवाच्या आकांतानं मदतीसाठी आरोळी ठोकली. त्या डोहाच्या पलीकडच्या बाजूला जो कोण उभा होता, तो एकदां मोठ्यानं हंसला आणि म्हणाला: – "हा आणखी एक!" – पण लगेच तो माझ्या मदतीला धावून आला. मला वांचवण्यासाठीं त्यानें त्या अथांग डोहांत उडी टाकली आणि थोडया वेळानं कोरडया जमिनीवर त्यानें मला आणून ठेवलं.

पुन्हां पुन्हां हाताच्या तळव्यांनीं मी डोळे पुसले. पण डोळे किती पाणी प्यायले होते, कुणास ठाऊक. कारण डोळे उघडल्याबरोबर जो असह्य प्रकाश दृष्टीस पडला, त्या दीप्तीच्या झळाळीनं मी पुन्हां डोळे मिटून घेतले. मग डोळे किलकिले करून हळूं हळूं दिसेल तें पाहूं लागलों. भोंवतालीं सगळीकडे हिरव्यागार गवता-चा अमर्याद महासागर पसरलेला होता. अशी प्रसन्न हिरवळ आणि असा तेजस्वी सूर्यप्रकाश जन्मांत कधीं माझ्या दृष्टीस पडला नव्हता. आठवत होतं तेव्हां-पासून आकाशाची एक निरुंद पट्टी तेवढी डोळयांना दिसत असे. पण आतां डोळे उघडून पाहिलं तर निळया आकाशाचा महासागर वर उचंबळला होता. निळया आकाशाचा महासागर हिरव्या गवताच्या महा-सागराला जिथं भिडला होता, तिथं डोंगरांची रांग उभी राहिलेली दिसत होती. हिरवळींतून प्रचंड वृक्ष आका-शाला कवळण्याचा यत्न करीत होते. आणि नितळ, स्वच्छ जलाशयांच्या आरशांत ठिकठिकाणीं भोंवतालची वनश्री प्रतिबिंबित झालेली दिसत होती. क्षितिजावरचे डोंगर कांहीं फार उंच नव्हते. आणि हिरवळीवर सगळी-कडे माणुसकीच्या खाणाखुणा उमटलेल्या दिसत होत्या. असंख्य माणसाच्या पायरवानें ती शस्यश्यामल भूमि निनादित झालेली दिसत होती.

क्षणभरानं मला वाटलं कीं गात्रांगात्रांत भरून राहि-लेला थकवा हळुं हळुं शरीराला सोडून जातो आहे. शुद्धीवर आल्यावर मी माझ्या प्राणदात्याकडे वळलों आणि त्याला हळूंच विचारलं,

"कायरे, ही जागा कोणीकडे जाते?"

माझ्या प्रश्नाचं त्याला नवल वाटलं असावं. हंसत हंसत तो म्हणाला,

"नाहीं. ही जागा कुठेंच जात नाहीं."

या माणसाचं वय पन्नाशीच्या आसपास असावं. – कदाचित् साठीच्या घरांत सुद्धां तो असेल. – आमच्या





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



तिकडच्या त्या रस्त्यावर माणसाच्या वयाची नीट ओळखच पटत नाहीं. – पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं या वृद्धाच्या स्वरांत कसल्या काळजीची म्हणून छटा नव्हती. उलट, त्या स्वरांत मधु-वयाचा मोकळेपणा होता. खरं म्हणजे त्यानं दिलेल्या माहितीनं मी चकित झालों होतों.

" मग ही जागा जाते तरी कुठें ? " – मीं पुन्हा अट्टाहासानं विचारलं. खरं म्हणजे माझा जीव वांचवल्याबद्दल आधीं मी कृतज्ञतेनं त्याचे आभार मानायला हवे होते. पण आमच्या प्रश्नोत्तरांची सुरुवातच अशी चमत्कारिक झाली होती.

" पण काय हो, प्रत्येक जागेनं कुठेंतरी जायलाच हवं कां ? " – सहज गमतीनं त्यानं मला विचारलं, आणि मग ओरडून त्यानं कोणाला तरी सांगितलं, – " कांहीं नाहीं. तो विचारतो आहे कीं ही जागा कुठें जाते म्हणून. "

तो बोलतो आहे तरी कोणाशीं, हें पहावं, म्हणून डोळ्यावर हात धरून मी दूरवर पाहिलं. पलीकडे एका झाडाच्या पारावर सांवलींत कांहीं लोक बसले होते. आणि ते खुणा करून त्याला कांहीं विचारीत होते. त्यांच्या प्रश्नाचं त्यानं दिलेलं उत्तर तेवढं मला ऐकूं आलं होतं.

माझे डोळे जसे त्या उन्हाला आणि प्रकाशाला सरावले, तसे भोंवतालीं दिसणाऱ्या अनेक दृश्यांची ते नकळत नोंद करूं लागले. मघाशीं मी म्हणालों कीं मी एका डोहांत पडलों म्हणून. पण खरोखर तो डोह नव्हता. कुंपणाच्या इकडच्या बाजूला रस्त्याशीं समांतर अशा वहात जाणाऱ्या पाटाच्या पाण्याची रुपेरी तार दोन्ही बाजूंना किती तरी दूरवर स्वच्छ दिसत होती. पाटाचं पाणी निळंभोर, या इकडची कुंपणाची बाजू हिरवीगार होती. कारण, कुंपणाच्या कांटेरी झाडवेलींचीं पाळंमुळं पाटाचं पाणी शोषून घेत होतीं. कुठें कुठें तर तीं पाण्यांत घुसलेलीं दिसत होतीं. पाण्यांत मासे चम्‌चम्‌ करीत होते. आणि खळखळ करीत वहात जाणाऱ्या त्या पाटाच्या दोन्ही बाजूंना छोट्या छोट्या झुडुपांवरचीं चित्रविचित्र रानफुलें शोभा देत होतीं. पण तें कांहीं असलं, तरी तो पाटसुद्धां खरोखर ओल्या कुंपणासारखाच होता. तें नितळ पाणी, हिरवंगार गवत, निळं आकाश, उंच उंच झाडं, पलीकडचे डोंगर, सरोवरांचे आरसे आणि पाटावर उगीचच चकाट्या पिटीत बसलेलीं तीं आनंदी माणसं – आसमंतांतल्या सर्व सजीव आणि निर्जीव वस्तू त्या कुंपणानं बंदिस्त केलेल्या होत्या. खरोखर हा विस्तृत आणि सुंदर प्रदेश एखाद्या मोठ्या अवाढव्य तुरुंगासारखाच होता. हा विचार मनांत आल्याबरोबर तिथं राहणाऱ्या त्या भावड्या माणसांची मला कींव आली.

थोड्या वेळानं मी चांगला हुशार झालों आहे, असं पाहिल्यावर माझ्या प्राणदात्यानं मला उठण्याची खूण केली. तसा ताड्कन उठून मी उभा राहिलों. आणि त्याच्याबरोबर लांब लांब ढांगा टाकीत भराभर चालायला लागलों. काय नवल आहे पहा ! पांचदहा मिनिटांपूर्वी हेच माझे पाय किती थकून गेले होते ! त्यांना रस्त्यावर पुढें ओढून नेतां येईना, म्हणून तर मी त्या मैलाच्या दगडावर बैठक मारली होती. पण आतां तेच पाय सारा थकवा विसरून जसे पुन्हा ताजेतवाने झाले होते आणि परत ताज्या दमानं देहाचं ओझं ओढायला लागले होते. पायांखालची वाट हिरवळींतून गेलेली होती. पायवाटेच्या दोन्ही बाजूंनीं आंब्याचीं डेरेदार झाडं रांगेंत उभीं होतीं. आणि त्यांच्या थंडगार सावलींतून फिरणं पावलांना मोठं सुखद वाटत होतं. आतां अडचण फक्त एकच होती. नकळत एकसारखा माझ्या दोस्ताला मागें टाकण्याचा मी यत्न करीत होतों. उगीचच कांहीं कारण नसतांना ! कारण ती जागा तर कुठेंच जात नव्हती हें आतां मला कळून चुकलं होतं. तेव्हां आतां कोणाला मागें टाकणं किंवा कोणाच्या पुढें जाणं, अशा शर्यतीला कांहीं अर्थच नव्हता. माझ्या भावाचा निरोप घेतल्यापासून कोणाच्याबरोबर म्हणून चालण्याची माझी संवयच सुटली होती. आणि तेव्हांपासून अगदीं एकाकीच मी त्या रस्त्यावरून सतत धांवत होतों.

आतांसुद्धा जरा पुढें धांवत जाऊन मग त्याची वाट पहात मी थांबलों होतों. माझ्याकडे पाहून तो गंमतीनं हंसत होता. आणि त्याचाच मला राग आला होता. तो जरा जवळ आल्याबरोबर त्याला हटकून मी म्हणालों, " हें काय ? हें तर भयंकर आहे. "

" काय ? काय भयंकर आहे ? " – त्यानं चमकून विचारलं.








" हें – हें असं चालणं – संथ, स्वस्थ, बेंगरूळ. हें काय चालणं झालं! मला मागें टाकून धांवत पुढें निघून जावं, अस कां वाटत नाहीं तुला?"

"कां? धावायचं कां? अन् तें कशासाठीं? तुम्हांला मागें काय म्हणून टाकायचं? कोणाला मागें टाकून एकटयानंच पुढें धांवत जाण्यांत काय मजा आहे?" – त्यानं सहज विचारलं.

"पण तूं धांवला नाहींस, तर तूं पुढें कसा जाशील? आम्ही रस्त्यावरची माणसं" —

"हो. हो. मला माहीत आहे."

"काय माहीत आहे? तुला कांहीं माहीत नाहीं. त्या पलीकडच्या रस्त्यावर माणसं काय वेगानं धावताहेत. —"

"मला माहीत आहे." – तो थंडपणानं पुन्हां म्हणाला.

"काय माहीत आहे? कांहीं माहीत नाहीं तुला. अरे, त्या रस्त्यावर कसली जीवघेणी शर्यत चालली आहे! त्या रस्त्यावरून धावत जाणारे लोक किती शिकतात, प्रगति करतात! तुला काय माहीत आहे? अरे, माझ्या छोटया आयुष्यांत मी केवढी प्रगति पाहिली आहे, तुला कांहीं कल्पना आहे का? तिकडे काय रणधुमाळी माजली आहे, महायुद्ध होताहेत –"

"तें सुद्धां माहीत आहे मला."—

"कांहीं माहीत नाहीं तुला! अरे, गेल्या महायुद्धाचा निकाल ॲटम बॉंबनं लावला. त्यावर आतां आम्ही कितीतरी प्रगति केली आहे. हायड्रोजन बॉंब –"

"तें सुद्धां माहीत आहे मला."

"काय माहीत आहे तुला? आतां हेंच पहा"– असं म्हणून पॅंटच्या खिशांतून मी स्पीडॉमीटर बाहेर काढला. त्यांत पाहिलं, तर फक्त मघांचीच ताशीं २५ मैलांची नोंद तशीच होती. मला कांहीं कळेना. हताश होऊन मी म्हणालों, –"अरेच्चा! बंद पडला वाटतं! नाहींतर दाखवलं असतं तुला. काय नवीं नवीं यंत्रं शोधून काढलीं आहेत आम्ही एकेक! आतां मी तुझ्याबरोबर चाललों आहे ना तर आपल्या वेगाची नोंद या स्पीडॉमीटरवर अचूक होते. आतां हें यंत्र बिघडलेलं दिसतं आहे खरं पण"–

"बिघडलं नाहीं. त्याचं असं आहे, तुमच्या तिकडच्या तीं यंत्रं या इकडे चालतच नाहींत बघा."

"असं कसं होईल? विज्ञानाचे सिद्धांत जगांत कुठें बदलतात वाटतं? आतां आलं माझ्या लक्षांत. पाटांतल्या पाण्यानं हें यंत्र बिघडलेलं दिसतं. मी एकसारखा धांवतच राहिलों असतों, तर हा स्पीडॉमीटर पण कधीं बंद पडला नसता! अरे, तिकडे त्या रस्त्यावर धावणाऱ्या आमच्यासारख्या लोकांनीं काय विलक्षण शोध लावले आहेत" –

अ सं कां हीं ना कां हीं ए क सा र खा मी बडबडत होतों. पण त्याचं माझ्याकडे विशेष लक्ष नसावं. कारण रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं लोक आमच्याकडे येत. कोणी शेतांतून काम करीत होते. कोणी उगीचच चकाट्या पिटीत होते. आम्हांला पाहिल्याबरोबर विचारपूस करण्यासाठीं तीं भाबडीं माणसं धांवत येत. नमस्कार-चमत्कार करीत. बोलण्यावरून बोलणीं वाढत. कुठें कुठें तर बायकामुलं फेर धरून नाचत होतीं. कुठें तरुण मुलं-मुली गाणीं गात होतीं. कुठें माणसं झाडांना पाणी देत होतीं. गवताच्या पेंढ्या बांधीत होतीं. वाखाच्या दोऱ्या वळीत होतीं. हजारों वर्षांपूर्वीं जेव्हां मनुष्य सुधारला नव्हता, तेव्हांचं आयुष्य हीं दुर्दैवी माणसं कंठीत होती. पण नवलाची गोष्ट म्हणजे इथलीं हीं सारीं माणसं मोठीं सुखी दिसत होतीं! कदाचित् त्यांच्या सुखांत भागीदार होण्याचा मोह मलासुद्धां झाला असता. पण ही जागा पुढें कुठेंच जात नाहीं, ही त्रासदायक गोष्ट मी विसरूं शकत नव्हतों.

माझ्या पायांना तर धावण्याची संवयच झाली होती. माझा दोस्त मात्र मधूनमधून एकसारखा थांबत होता. लोकांशीं बोलत होता. हंसतखिदळत होता. आणि विनाकारण मागें पडत होता! मग विनाकारण त्याची वाट पहात त्याच्यापाठीं मला एकसारखं थांबावं लागत होतं. असाच एका झाडाखालीं त्याची वाट पहात मी उभा होतों. इतक्यांत समोरून एक आडदांड बाप्या तीरासारखा धांवत आला. वाटेंतल्या खांचखळग्यांवरून सहज उड्या मारीत तो धांवत आला. एका उंच झाडावर सरसर चढला. थेट झाडाच्या शेंड्यावर चढून बसला. आणि डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच त्यानं तिथून अंग झोकून दिलं. खालीं तलावाचं पाणी होतं, म्हणून बरं. जसा तीरासारखा तो धांवत आला, तसाच तीरासारखा तो पाण्यांत घुसला. आणि












पाहतां पहातां लांबलांब हात मारीत दिसेनासा झाला. त्याच्यामागून आणखी कोणी धांवत येताहेत कीं काय, म्हणून मी लक्षपूर्वक पहात होतों. माझा मित्र जवळ आल्यावर मी त्याला विचारलं,

" हें काय ? बाकीचे सारे कुठें आहेत ? "

" बाकीचे सारे नाहींतच. "—तो म्हणाला.

" म्हणजे ? याचा अर्थ काय ? मला तर वाटलं कीं ही क्रॉस – कंट्री रेस चालली आहे ! "

यावर माझा मित्र नुसता हंसला. आणि आम्हीं चालायला लागलों. रस्त्याच्या एका बाजूला पुरुषभर उंचीचीं ताटं वाढलेलीं होतीं आणि त्यांतून एका मुलीच्या गाण्याच्या स्वैर लकेरी ऐकूं येत होत्या. तिच्या मधुर गाण्यानं सारं वातावरण जसं नादमय झालं होतं. माझ्याकडे पाहून मिस्किलपणानं हंसत तो गंमतीनं म्हणाला, " बाकीचे सारे नाहींतच ! "

जसजसे आम्हीं पुढें जाऊं लागलों, तसतसा माझा राग वाढूं लागला. कारण इथें सगळीकडे झाडांना गोड गोड रसरशीत फळं लगडलेलीं दिसत होतीं. मैल मैल लांब शेतांतून ताटं कणसाला आलेलीं होतीं. तें सारं पाहून या लोकांच्या भयंकर अज्ञानाची मला भयंकर चीड आली ! कारण हें सारं दीघोद्योगी उत्पादन केवळ निरर्थक होतं, हें मला दिसत होतं. अर्धवट स्वतःशींच मी म्हणालों, " हें काय ? याचा अर्थ काय ? "

माझ्याकडे पाहून तो पुन्हां हंसला. आणि म्हणाला, " सर्वच गोष्टींत अर्थ शोधायला हवा, असं थोडंच आहे ? निरर्थक गोष्टींनींसुद्धां इथल्या लोकांना आनंद होतो ! "– जसा कांहीं मी एखादा शाळकरी मुलगाच होतों ! आणि न कळणाऱ्या गोष्टी तो मला शांतपणानं समजावून सांगत होता !

" नाहीं. मला हें पटत नाहीं. माणसानं प्रत्येक गोष्टींत अर्थ शोधला पाहिजे. अर्थाशिवाय सारं निरर्थक आहे ! "– काय वेड्यासारखा बोलत होतों मी ! या असंस्कृत माणसाच्या बथ्थड डोक्यांत माझी ही कोटी शिरूं शकणार नाहीं, एवढंसुद्धां भान मला राहिलं नाहीं. तरीसुद्धां, त्याला कळणार नाहीं हें माहीत असून त्याला समजावून सांगण्याच्या तळमळीनं मी त्याला सांगितलें,– " सारं उत्पादन योजनाबद्ध झालं पाहिजे. फुलांचा तर कांहीं उपयोगच नाहीं म्हणा. पण झाडावरचं प्रत्येक फळ आणि गाण्याची प्रत्येक लकेर कारणीं लागली पाहिजे "– पण या अडाणी माणसाशीं बोलण्याचा आतां मला अगदीं कंटाळा आला होता. माझ्या मनांतली ही गोष्ट वेगळया रीतीनं मी सुचवून पाहिली. मी म्हणालों,– " आधींच तुझे फार उपकार झाले आहेत माझ्यावर. माझा जीव तूं वांचवला आहेस. तो जीव आतां कारणीं लावायला हवा. त्यासाठीं आधीं त्या रस्त्याचा शोध घ्यायला हवा. आणि स्पीडॉमीटर दुरुस्त करून घ्यायला हवा. "

" पण त्यापूर्वीं तुमच्या त्या रस्त्याकडे जाणाऱ्या वाटेचा शोध घ्यायला हवा. "

" म्हणजे काय ? त्या आमच्या रस्त्याकडे जाणाऱ्या वाटा आहेत का तुमच्या या जंगलांत ? "

" आहेत तर. वाटा आहेत. दरवाजे पण आहेत. "

" मग चल तर. आधीं मला वाट दाखव पाहूं. "

त्यानं मुकाट्यानं पायांखालची वाट सोडली , आणि रस्त्याची वाट धरली. त्याच्या मागोमाग मी मुकाट्यानं चालायला लागलों. थोड्या वेळानं आम्ही त्या पाटाशीं येऊन पोंचलों. पाटाजवळ एकदम वाट संपली. इथं पाटाचं पात्र चांगलंच रुंद होतं. आणि पलीकडे जाण्यासाठी एक झुलता पूल होता. पुलाच्या पलीकडे एक मोठा दरवाजा होता. हस्तिदंतासारखा पांढरा शुभ्र. तो दरवाजा कुंपणांतच उभा केलेला दिसत होता. त्याचीं दारं कुंपणाच्या पलीकडे बाहेरच्या बाजूला उघडण्यासारखीं केलेलीं दिसत होतीं. दाराच्या फटींतून पलीकडचा रस्ता स्वच्छ दिसत होता.– नुकताच मी सोडून दिला होता तसा, थेट अगदीं तसाच रस्ता ! – रस्त्यावर धूळ सांठलेली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना कुंपणांचे बांध घातलेले होते. आणि त्या बांधांमधून दृष्टि पोंचेपर्यंत तो रस्ता सरळ पुढें गेलेला दिसत होता.– अगदीं थेट क्षितिजापर्यंत. तो माझा रस्ता दिसल्याबरोबर आनंदानं हरखून मी ओरडलों,– " अरेच्चा, हा तर माझाच रस्ता ! "

पण त्यानं मला तात्काळ मागें खेंचलं. तो म्हणाला,– " हं. हं. हा तोच रस्ता आहे खरा. पण रस्त्याच्या ज्या भागांत तूं धांवत होतास, तो हा नाहीं. इथूनच तुझा रस्ता सुरू होतो. हजारों वर्षांपूर्वी आमच्यांतलींच कांहीं माणसं इथून या रस्त्यानं पहिल्यांदा गेलीं. त्यांना एकदम पाय शिणवायची लहर आली होती ! "

तो काय बोलत होता, तें त्याचं त्यालाच कळत होतं कीं नाहीं, कुणास ठाऊक ? कारण तो रस्ता मी जिथं सोडून दिला होता, ती जागा इथून फार तर मैल दोन मैलांपेक्षां अधिक लांब नाहीं, हें माझ्या डोळ्यांना स्वच्छ दिसत होतं. पण माझ्याबरोबरचा हा अडाणी माणूस आपल्या पिकलेल्या केसांचा हवाला देऊन अट्टाहासानं मला सांगत होता, – आणि मी ऐकत होतों, – " बरोबर आहे तुझं म्हणणं. हा रस्ता तोच आहे. इथूनच तो निघाला आहे. इथून जरी तो सरळ पुढें गेलेला दिसला, तरी खरोखरच या जागेपासून तो कधींच फार दूर जात नाहीं. बहुतेक वेळां आमच्या हद्दीच्या बाजूबाजूनंच तो जातो. आणि केव्हां केव्हां तर आमच्या हद्दीच्या कुंपणाला तो भिडल्यासारखा दिसतो ! " —

म्हातारा काय बडबडत होता, कुणास ठाऊक ? मला तर कांहीं त्याचा बोध होत नव्हता. मला समजावं, म्हणून एकदां तो खालीं वांकला आणि पाटाच्या कांठावरच्या ओल्या मातींत एका काडीनं त्यानं एक चित्रविचित्र आकृति काढली. त्या रस्त्याचा नकाशा होता तो बहुतेक. मुळांत तो नकाशाच चुकलेला आहे आणि म्हाताऱ्याला दिशांचं कांहीं ज्ञान दिसत नाहीं, हें आतां मला पुरतेपणीं समजून चुकलं होतं. तो तर जणूं असंच भासवीत होता कीं आमच्या त्या रस्त्याला असंख्य वळणं आहेत. त्याचं तें सचित्र भाष्य ऐकून मी रागारागानं म्हणालों, – " तुझा हा सारा नकाशाच पार चुकलेला आहे. तुला दिशा पण समजत नाहींत. आमचा हा रस्ता एकसारखा सरळ पुढेंच जातो आहे, हें तर मी माझ्या या डोळ्यांनीं साक्षात् गेलीं कित्येक वर्षं पहात आलों आहे. हा रस्ता सतत पुढेंच जातो आहे. "

" पुढें म्हणजे कुठें ? " – त्यानं भाबडेपणानं विचारलं.

" कुठें तें मलासुद्धां माहीत नाहीं. आमच्यापैकीं कुणालाच तें माहीत नाहीं. कदाचित् एखाद्या गगनभेदी पर्वताच्या पायथ्याशीं हा रस्ता खुंटत असेल. किंवा कुणीं सांगावं, कदाचित् तो रस्ता सरळ समुद्रांत घुसत असेल. पण हा रस्ता एकसारखा पुढेंच जातो आहे, याची साक्ष पटवायला डोळेच हवेत, असं नाहीं. हा रस्ता असा सरळ पुढेंच जातो आहे, म्हणून तर आम्ही आपापसांत एकमेकांच्या पुढें जाण्यासाठीं एकसारखे झगडतों आहोंत. दुसऱ्यांना मागें टाकणं आणि अखंड धांवत सर्वांच्या पुढें जाणं, - हें तर आमच्या साऱ्या धडपडीचं सूत्र आहे. त्यामुळेंच तर अखंड पुढें जाण्यासाठीं आमच्या पायांत प्रत्यहीं नवी ताकद संचारते. तुमच्यांत आणि आमच्यांत जो फरक आहे, तो हाच. नाहींतर तुम्ही लोक ! इथं एकाच जागीं सडत कुजत मरतां. तिथं रस्त्यावर स्पर्धा आहे. आणि स्पर्धा आहे म्हणून जिवंतपणा आहे. तुम्हां लोकांना कांहीं करावंसंच वाटत नाहीं. म्हणून तुम्ही कधींच मरून गेलां आहांत. आतां मघांचाच तो बाप्या पहा ना. तो धांवला चांगला. उड्या पण चांगल्या मारल्या त्यानं. पोहला चांगला. हें सारं खरं. पण तिथं आमच्यांत एकेक माणूस असा आहे कीं जो त्याच्यापेक्षां अधिक वेगानं धांवेल, अधिक चपळाईनं उड्या मारील, अधिक दमानं पोहत राहील. एकाच विषयांत प्रावीण्य मिळविण्याच्या ईर्ष्येनं जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत आम्ही राक्षसी विक्रम करून ठेवले आहेत. – त्याचप्रमाणें मघांची ती चोरून गाणारी मुलगी – "

पण हें वाक्य मी कांहीं पुरं केलं नाहीं. इतक्यांत माझी नजर दुसरीकडे वळली. त्यासरशीं मी एकदम ओरडून उठलों. – " अरेच्चा, ही काय भानगड आहे ? ती पहा पलीकडे एक बाई पाण्यांत पाय सोडून बसली आहे. मला चांगलं माहीत आहे म्हणून. नाहींतर थेट आमच्या डॉ० मुमताज रामदाससारखी ती दिसते आहे. एक क्षणभर तर मी फसलोंच. मला वाटलं कीं तीच ती म्हणून. "

" कां बरं ? तीसुद्धां असेल. "

" छेः छेः ती कशी असेल ? शक्यच नाहीं तें. आतां नुकतीच मला मागें टाकून ती पुढें निघून गेली. आतां संध्याकाळीं साडेपांच वाजतां तिचें व्याख्यान आहे. आतां किती वाजले आहेत ? " – किती वाजले तें पहाण्यासाठी मी खिशांतून घड्याळ बाहेर काढलें. पण तें सुद्धा बंद पडलं होतं ! कुठलंच यंत्र म्हणून इथें चालणार नाहीं, असा शाप आहे कीं काय या दुर्दैवी भूमीला ? – छेः पण ही बाई डॉ. मुमताज रामदास असणं शक्यच नाहीं. !

" कां ? नवल वाटलं तुम्हांला ? मग मी सांगतों

कीं त्यांत नवल वाटण्यासारखं कांहीं नाहीं. रस्ता सोडलेले असे पुष्कळ लोक इथं एकमेकांना पाहून असेच आश्चर्यचकित होतात. या कुंपणांतून सर्व प्रकारचे रस्त्यावरचे लोक इथं हरघडीं येतच असतात. –शर्यतींत पुढें धांवणारे इथं येतात. शर्यतींत मागें पडलेले पण येतात. फार काय तुमच्या त्या रस्त्यावर धांवतां धांवतां उरीं फुटून जे मधेंच मरगळतात, ते सुद्धां इथं येतात. पुष्कळ वेळां या कुंपणाजवळ उभा राहून मी त्या रस्त्याचा कानोसा घेतों. रस्त्यावरचे अनेक आवाज इथं स्पष्ट ऐकूं येतात. –कसले आवाज, तें तुम्हांला चांगलं माहीत आहे! – आणि मग कोण शर्यत सोडून इकडे येतो, त्याची मी मजेंत वाट पाहात बसतों. आज तुम्हांला जसं मी पाटांतल्या पाण्यांतून ओढून काढलं, तसंच आणखी कितीतरी लोकांना मी जीवदान दिलेलं आहे. रस्ता सोडून इथं आलेल्या प्रत्येक माणसाचं आम्ही मोठ्या आनंदानं स्वागत करतों. कारण आमच्या या देशांत फारच थोडे लोक आहेत. खरं म्हणजे जगांतल्या सर्व माणसांना पुरून उरेल एवढा मोठा हा देश आहे. पण इथं माणसंच फार कमी आहेत!"

"असणारच. माणसांना त्यांचे त्यांचे उद्योग आहेत. त्यांना कांहींतरी करायचं आहे. शर्यतींत पुढें जायचं आहे" – मी त्याला समजावून सांगत होतों. एखाद्या लहान मुलासारखा कुतूहलानं तो माझं बोलणं ऐकत होता. पण इतक्यांत मला रस्त्याची आठवण झाली. आतां मला भर वेगांत धांवावं लागणार आहे. संध्याकाळ झाली होती. काळोख व्हायच्या आंत रस्त्यावर पोंचायलाच हवं होतं.

"बरं आहे. येतों मी." – असं म्हणून मी एकदम रस्त्याकडे तोंड वळवलं. त्यासरशीं त्यानं माझे बखोटे धरून जोरांत मला मागें खेचलं. आतां मात्र मला त्याची भीति वाटली. त्याच्या हातांतून सुटण्यासाठीं मी जराशी धडपड करून पाहिली. पण त्याची पकड जबरदस्त होती!

"तुम्हांला तसा मी जाऊं देणार नाहीं" – तो म्हणाला

"म्हणजे काय? मला जायलाच हवं." – मी आवर्जून सांगितलं. पण तिथला पाहुणचार घेतल्याशिवाय तो मला सोडायलाच तयार नव्हता. खरं म्हणजे आतां मला त्याची संगत तापदायक वाटायला लागली होती. पाहुणचाराचं त्याचं आमंत्रण अगदीं मनापासूनचं होतं. पण मला कुठें त्याचा पाहुणचार हवा होता? त्याच्या मगरमिठींतून स्वतःला सोडवून घेण्यासाठीं मी पुष्कळ धडपड करून पाहिली. पण कांहीं केल्या म्हातारा मला सोडीच ना आणि कुस्तीचं शिक्षण तर मी मुळींच घेतलेलं नव्हतं. तसे अव्वल दर्जाचे प्रसिद्ध कुस्तीगीर आमच्यांत कितीतरी होते! पण कुस्ती हा कांहीं माझ्या खास अभ्यासाचा विषय नव्हता. तेव्हां शेवटीं मुकाट्यानं त्याच्या मागोमाग जाणं मला भागच पडलं.

एक गोष्ट तर खरीच. ज्या ठिकाणीं मी कुंपणांतून बाहेर पडलों होतों, ती नेमकी जागा एकट्यानं शोधून मला कधींच सांपडली नसती. वाटेनें त्याची बडबड एकसारखी चालूच होती. या नव्या पाहुण्याला तिथलं काय दाखवूं आणि किती दाखवूं, असं त्याला होऊन गेलं होतं. त्याचं हे कंटाळवाणं दाखवणं संपल्याशिवाय तो कांहीं माझ्या जागीं मला नेऊन सोडणार नाहीं, हें आतां मला पकं कळून चुकलं होतं. कांहीं झालं तरी एक निश्चय मी मनाशीं करून ठेवला होता कीं, इथं झोंपायचं म्हणून नाहीं. हा देश मला परका होता. इथले लोक मला परके होते. तसा हा देश चांगला होता. तिथले लोक पण चांगले होते. पण तरीसुद्धां त्यांच्याविषयीं माझ्या मनांत अढी होती. खरं म्हणजे आतां मला चांगली सडकून भूक लागली होती. कितीतरी वेळां त्यानं मला दूध पिण्याचा आग्रह केला. वाटेंत लोकांनीं हंसत मुखानं मला नाना प्रकारचीं रसरशीत फळं दिलीं. पण मला तिथलं दूध प्यायचं नव्हतं. तिथलीं फळं खायचीं नव्हतीं. चारदोन लोकांनीं मधानं भरलेले द्रोण माझ्या पुढ्यांत ठेवले. पण मला तिथला मधसुद्धां नको होता. प्रत्येक वेळीं मोठ्या विनयानं, "मला भूक नाहीं" म्हणून मी सांगितलं. तिथल्या बायकामुलांनीं रंगी – बेरंगी सुगंधी फुलांचे गुच्छ माझ्या हातीं दिले. पण कोणाचं लक्ष नाहीं, असं पाहून मी ते वाटेंतच टाकून दिले. जशी संध्याकाळ झाली, तसे कितीतरी लोक तिथं गोळा व्हायला लागले. कांहीं गलिच्छ माणसं तर गुरांढोरांसारखीं जमिनीवरच बसून उगीच इकडच्या तिकडच्या गप्पा छाटीत होतीं. आणि कांहीं जण तर







चक्क त्या हिरवळीवर लोळत होते. झाडांच्या पारांवर आणि शेतांच्या बांधांवर जमून माणसं चकाट्या काय पिटीत होतीं ! नाचत काय होतीं ! गाणीं काय गात होतीं ! त्या जंगली माणसांचा तिथला तो आयुष्यक्रम पाहून खरोखरच मला त्यांची दया आली. या लोकांना अगदींच कसं कांहीं कळत नाहीं ! मला कांहींच समजेना. पलीकडे रस्त्यावरून सारं जग धांवत होतं, पुढें जात होतं आणि हे सारे अडाणी आळशी लोक इथं वेळेचा, उत्साहाचा आणि शक्तीचा कोण अपव्यय करीत होते ! त्या विचारानं माझं मन मनस्वी खिन्न झालं.

मावळत्या सूर्याच्या नारिंगी प्रकाशांत या हट्टी म्हाताऱ्याबरोबर मी भराभर चालत होतों. माझ्या पायांत पुन्हा शिसं भरायला लागलं होतं. पोटांत कावळे ओरडत होते. पण मनांत मी प्रार्थना करीत होतों : ' मला माझा तो रस्ता हवा आहे. रस्त्यावरच्या शर्यतींत धांवायला हवं आहे. त्या रस्त्यावर खरं जीवन आहे. तिथं संघर्ष आहे. युद्ध आहे. जय आहे. पराभव आहे. अपेश आहे. पण आशा आहे. तिथं द्वेष आहे. तिरस्कार आहे. स्पर्धा आहे. त्या स्पर्धेंतच जीवनाचा अर्थ आहे. तो रस्ता अनंत आहे. त्याचा शेवट कुठें होतो, तें मला माहीत नाहीं. पण तरी सुद्धां त्या रस्त्यावरच्या स्पर्धेंतच खरं पौरुष आहे. तिथं उरीं फुटून मरण्यांत सुद्धां विलक्षण आनंद आहे ! '

शेवटीं पाटाच्या कांठानं चालतां चालतां आम्ही दुसऱ्या एका पुलापाशीं येऊन थांबलों. तिथं सुद्धां पाटाचं पात्र बरंच रुंद दिसत होतं. इथंहि पुलाच्या पलीकडे कुंपणाच्या बाजूला एक मोठा दरवाजा होता. मघांच्या त्या पहिल्या दरवाज्यासारखाच. पण या दरवाज्याचीं दारं पारदर्शक होतीं आणि आंतल्या बाजूला उघडतील अशीं होतीं.

आतां काळोख दाटायला लागला होता. त्या दारांतून मी पलीकडे पाहिलं. तिकडे सुद्धां तोच रस्ता होता. जो रस्ता मी सोडला, तसाच कठीण, कंटाळवाणा, धुळीनं भरलेला, दोन्ही बाजूंनीं उंच उंच कुंपणांनीं बंदिस्त केलेला, लांबच लांब, अनंत असा तो रस्ता होता.

तो रस्ता फिरून दिसल्याबरोबर माझ्या मनांत अस्वस्थतेची कळ उमटली. असं वाटलं कीं या निर्वाणींच्या क्षणीं मनांवर लादलेले संयमाचे सारे बंध तटातट तुटून निखळून पडताहेत ! तेवढ्यांत बाजूनं एक मनुष्य येतांना दिसला. रात्रीच्या निवाऱ्यासाठीं डोंगरांच्या दिशेनं झपाझप पावलं टाकीत तो चाललेला होता. त्याच्या कमरेला कोयता खोंचलेला होता. खांद्यावर फावडं होतं. डोक्यावर फुलांफळांनीं भरलेली वेताची टोपली होती. त्याच्या हातांत कसला तरी बुधला होता, तो एकसारखा त्याच्या चालीनं हिंदकळत होता. त्या मूढ क्षणार्धांत मनुष्यजातीचं अवघं भवितव्य मी झुगारून दिलं. डोळ्यांसमोर पसरलेल्या त्या अनंत रस्त्याचा मला विसर पडला. त्याच्या पाठोपाठ मी धांवत सुटलों. त्याच्या हातांतला बुधला मी हिसकून घेतला आणि एकदम तोंडाला लावला. त्या बुधल्यांत मध होता कां मद्य होतं, त्याचं पण भान मला राहिलं नाहीं. पण माझ्या शिणलेल्या गात्रांना त्या रसायनानं संजीवन दिलं, हें मात्र खरं. त्या धुंद क्षणांत जसं कांहीं मी एक स्वप्न पाहिलं. जसा कांहीं माझा तो वृद्ध सांगाती दारं सताड उघडून देत होता आणि माझ्याकडे वळून मला सांगत होता, – ' या इथं तुझ्या रस्त्याचा शेवट झाला. आतां या दारांतून सर्व लोक इकडेच येतील. रस्ताच संपल्यावर त्यांना दुसरी गतीच नाहीं. '

नंतर पुढें काय झालं, तें मला धड कांहींच आठवत नाहीं. मला आठवतं तें एवढंच कीं रात्रपक्षी जादूनं भारलेलीं गोड गोड गाणीं गात होते. ओलसर गवताचा धुंद सुगंध सगळीकडे दरवळला होता. आणि वर आभाळांतून तारका अमृतवर्षाव करीत होत्या. ज्या माणसाच्या बुधल्यांतलं रसायन मी चोरून प्यायलों होतों तोच मनुष्य मला अलगद उचलून हिरवळीच्या मऊ मऊ शय्येवर ठेवीत होता. मंद चंद्रप्रकाशांत त्याची आकृति माझ्या ओळखीची वाटली. हळुं हळुं रस्त्याचा मला विसर पडत होता. आणि आठवत होती ती फक्त एकच गोष्ट, – तो माझाच भाऊ होता ! माझा सख्खा भाऊ होता ! !

[ ई. एम्. फॉर्स्टरवरून ].

---








प्रा. अ. भि. शहा

# धर्म क्रान्तिकारक कीं क्रान्तिविरोधी ?

'नवभारता'च्या गेल्या जुलै १९५५ च्या अंकांत आचार्य जावडेकर यांनीं 'धर्म आणि समाज-क्रान्ति' असा एक लेख लिहिला असून त्यांत धर्म ही समाजाला बंधनमुक्त करूं शकणारी क्रान्तिकारक शक्ति होऊं शकेल अशा अर्थाचें प्रतिपादन केलें आहे. धर्म हा किती अपायकारक होऊं शकतो याचें हिंदुस्थानची झालेली फाळणी हें मूर्तिमंत उदाहरण आहे. तें पाहिल्या-नंतर तरी आपल्या समाजांतील धर्माचें स्थान वर्णन करतांना व धार्मिक परिभाषा वापरतांना राजकीय विचारवंत सावधगिरी राखतील असें वाटलें होतें. तात्त्विक विचार आणि त्यांचा प्रत्यक्ष आचार यांमधील अंतर आपल्या देशामध्यें पाश्चात्त्य देशांच्या मानानें खूपच आहे. शिक्षणासारख्या निरुपद्रवी क्षेत्रांतहि तें आप-ल्याकडे दिसून येतें. अशा परिस्थितींत, धर्म म्हणजे आपल्या सर्व रोगांवर रामबाण उपाय आहे असें मानणें हें फक्त संतांनाच शक्य आहे. अर्थात् आचार्य जाव-डेकर यांनीं धर्माची तरफदारी करतांना, त्यांतील अनिष्ट गोष्टी काढून, त्याला चांगला 'तावून सुलाखून', सोज्ज्वळ करून घेतला आहे हें खरें. पण त्यामुळेंच असा सोज्ज्वळ करून घेतलेला धर्म सामाजिक व मानसिक क्रांति घडवून आणण्याचें साधन म्हणून किती प्रभावी होऊं शकेल याची वानवाच आहे. आचार्य जावडेकर हे थोर विचारवंत असून, विचारांची समीक्षा करणें हें त्यांचें जीवनकार्य आहे. सर्वोदयाला तत्त्वज्ञानाचें अधि-ष्ठान द्यावयाचा त्यांचा प्रयत्न आहे. म्हणूनच त्यांच्या विचारांचें थोडें सविस्तर परीक्षण करणें आवश्यक आहे. आणि विचार सुस्पष्ट होण्याच्या दृष्टीनें हें परीक्षण खोलांत जाऊन सडेतोडपणें होण्याचीहि गरज आहे.

आचार्य जावडेकरांच्या विचारामागील तात्त्विक भूमि-केचें परीक्षण करण्यापूर्वी, 'जीवनाचें तत्त्वज्ञान' याचा नक्की आशय निश्चित करणें आवश्यक आहे. जीवना-च्या तत्त्वज्ञानाकडून द्विविध कार्य अपेक्षित असतें. एक म्हणजे त्यांतील वैचारिक उपपत्तीच्या द्वारें, विश्वाचें समग्र चित्र डोळ्यापुढें उभें करून, विश्वांत माणसाचें स्थान काय याचें ज्ञान करून देणें. दुसरें म्हणजे माणसानें स्वतः-च्या वैयक्तिक जीवनांत व समाजांत कसें वागावें याचें नीतिनियमांच्या द्वारें मार्गदर्शन करणें. अलीकडील विज्ञानाधिष्ठित तत्त्वज्ञान सोडून बाकीच्या धर्माधिष्ठित, सर्वाधिकारवादी इत्यादि तत्त्वज्ञानपद्धतींमध्यें एक समान वैशिष्ट्य आढळून येतें. तें म्हणजे त्या त्या तत्त्वज्ञानां-तील नीतिनियमांचा आचारविषयक भाग हा त्या तत्त्वज्ञानांतील विश्वविषयक विचाराच्या अधिष्ठानावर आधारलेला असतो. अशा तत्त्वज्ञानांतून विश्वाविषयीं जी कांहीं अतिभौतिक उपपत्ति बसविली असेल, त्या उपपत्तीनें नीतिशास्त्र ठरत असतें. विश्वोत्पत्तीविषयीं ज्या कांहीं कल्पना केल्या असतील त्या कल्पनांवर समाज-शास्त्राचे नियम बसविले जातात. विश्वाच्या बुडाशीं कांहीं नियंत्रक तत्त्व असून या जगांत जें कांहीं घडून येतें तें या विश्वतत्त्वाच्या व्यापाराचा आविष्कार होय, असें ह्या तत्त्वज्ञानपद्धती मानतात. चिद्वादी हेगेल विश्व हें एका परम चिद्वस्तू-( Idea ) चें उत्क्रान्त रूप मानतो, तर जडवादी मार्क्सला विश्व हें विरोधविकास-वादाच्या नियमांचा आविष्कार वाटतें. आपापली विश्वविषयक उपपत्ति हीच अंतिम सत्याचें ज्ञान करून देणारी आणि व्यक्तीनें कसें वागावें याचें मार्गदर्शन कर-णारी आहे असें दोघांनाहि वाटतें. विश्वाची अशी कांहीं अतिभौतिक ( Metaphysical ) उपपत्ति लावली तरच मानवी घडामोडींचा अर्थ लागतो असें दोघेहि मानतात आणि मानवी वर्तनाचा चांगले-वाईटपणा त्या आपल्या विश्वविषयक उपपत्तीच्या कसोटीवर ठरवीत असतात. परंतु जर तर्कशुद्ध रीतीनें विचार केला, तर या तत्त्वप्रणालींचें पर्यवसान शेवटीं एकछाप हुकूमशाही संस्कृतींत होण्याचा धोका आहे. या तत्त्वज्ञानाच्या छायेखालीं वाढणाऱ्या राज्य-संस्था, धर्मसंस्था, राजकीय पक्ष हे आपणांस विश्वसत्य कळलें आहे असा दावा करून व्यक्तीचें जीवन संपूर्ण-पणें नियंत्रित करून टाकतात. आचार्य जावडेकर प्रतिपादतात तशा धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानाचीहि रचना अशीच हेगेल व मार्क्सच्या सारखीच आहे. धर्मा-धिष्ठित तत्त्वज्ञानांत ज्या श्रद्धा प्रामुख्यानें आढळून येतात त्या म्हणजे ( १ ) आत्मा, व एखादा सगुण ईश्वर वा दैवी विश्वशक्ति यांवर विश्वास ( २ ) मानवी पुरुषार्थाचें अंतिम उद्दिष्ट म्हणजे इन्द्रियविषयांच्या मोहपाशांपासून व कर्मबंधापासून मुक्त होणें अशी मोक्षविषयक श्रद्धा. ईश्वर मानणाऱ्या धर्मांमध्यें तर परमेश्वरांत विलीन होऊन जाणें हेंच अंतिम उद्दिष्ट

मानलें आहे.

धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानांतील मूल्यें भूतदयावादी संन्यासवादाला साजेशीं असतात. आधुनिक वैज्ञानिक संस्कृतीनें जोपासलेलीं जीं मूल्यें – उदा० आर्थिक व सामाजिक पातळीवरील समता, व्यक्तीच्या सर्जनशक्तीला अधिकाअधिक स्वातंत्र्य मिळत जावें ही कल्पना, त्याचप्रमाणें कलांच्या मूल्यांचें केन्द्र कोठें मानवाच्या बाहेर वा पलीकडे नसून तें मानवांतच आहे, हा विचार– हीं सर्व मूल्यें धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानांत तर्कदृष्ट्या बसत नाहींत. अर्थात्, आचार्य जावडेकर असें म्हणूं शककतील कीं ज्या धर्माचा वा धार्मिक वृत्तीचा मी पुरस्कार करीत आहे, त्यामध्यें उपरिनिर्दिष्ट मूल्यें आपल्या जीवनांत जाणूं इच्छिणाऱ्या व्यक्तीला प्रतिबंध करणारें असें कांहीं नाहीं. पण ज्या आचार्य विनोबा व महात्मा गांधी यांच्या वचनांचा ते आधार घेतात. त्यांचें याबाबत काय म्हणणें आहे हें पहाणें उद्बोधक ठरेल. आचार्य विनोबांचा पुढील उतारा पहावा : ( 'गीताप्रवचनें' १९५४. पान १८३–१८४ )

"चातुर्वण्याची व्यवस्था मला गोड वाटते याचें कारण हेंच कीं तींत स्वाभाविकता व धर्म आहे. हा स्वधर्म टाळून चालणार नाहीं. जे आईबाप मला लाभले तेच माझे आईबाप. आईबापांचा धंदा स्वभावतःच मुलाला प्राप्त होत असतो. **जो धंदा पूर्वापार चालत आला तो जर नीतिविरुद्ध नसेल तर तो करणें, तोच उद्योग पुढें चालविणें, हा चातुर्वर्ण्यांतील एक मोठा विशेष** आहे. पण चातुर्वर्ण्याची कल्पना जरी बाजूस ठेवली तरीहि सर्व राष्ट्रांत सर्वत्र जेथें चातुर्वर्ण्य नाहीं तेथेंहि स्वधर्म सर्वांना प्राप्त झालेला आहे. दूरचीं कर्तव्यें – तीं कर्तव्यें म्हणणें गौणच–कितीहि चांगलीं दिसलीं तरी तीं घेतां कामा नयेत. **प्राप्तधर्म साधा असला, कमी वाटला तरी जो मला प्राप्त तोच भला, तोच सुंदर !**" ( जाड टाइप प्रस्तुत लेखकाचा. ) समाजांतील परिवर्तनशीलता ( Social mobility ) विनोबांना मान्य नाहीं हें लक्षांत घेण्यांसारखें आहे.

त्यानंतर म. गांधींचा पुढील उतारा पहावा :

" Let me explain what I mean by religion ... It is the permanent element in human nature which counts no cost too great in order to find expression and which leaves the soul restless until it has found itself, known its Maker, and appreciated the true correspondence between the Maker and itself "– वरील उतारा आचार्य जावडेकरांनीं आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ म्हणून दिला आहे. ज्याला आधुनिक विज्ञानाचें – विशेषतः मानसशास्त्राचे तत्त्वज्ञानविषयक निष्कर्ष परिचित आहेत अशा कोणीहि वरील उतारा वाचला तर त्यांत त्याला महात्माजींच्या मानसिक घडणींत जी अगम्य गूढवादी छटा होती तिचा आविष्कार दिसेल. गूढवाद्याचा अनुभव दुसऱ्याला संक्रान्त करतां येत नाहीं. असें असतां, गूढवाद्याच्या अनुभवावर व्यक्तीच्या व समाजाच्या नैतिक जीवनाची उभारणी करूं पहाणें याचा अर्थ सर्व विवेकाधिष्ठित बुद्धिवादी नीतिशास्त्रच, कांहीं लोकविलक्षण पुरुषांच्या लहरीवर म्हणा किंवा भ्रमावर म्हणा किंवा (आध्यात्मिक) अहंकारावर म्हणा, सोंपवून त्याला कायमचें पारखें होणें असाच होतो. शिवाय असें कीं जी गूढवादी धार्मिक अनुभूति ज्ञानविज्ञानक्रियेचे दरवाजेच बंद करून टाकते तिला क्रान्ति घडवून आणणारी विमोचक शक्ति म्हणणें कितपत सयुक्तिक होईल ? – खऱ्या शास्त्रशुद्ध दृष्टीनें विचार करतां, केवळ राजकीय आणि सामाजिक गुलामगिरींतूनच नव्हे तर मानवापलीकडे कांहीं अति मानवी शक्ति आहे या भावनेच्या भ्रामक बंधनांतून जेव्हां मनुष्य मुक्त होईल तेव्हांच तो संपूर्ण अर्थानें मनुष्य या संज्ञेस पात्र होईल.

आचार्य जावडेकरांनीं प्रतिपादिलेल्या धर्माधिष्ठित किंवा आध्यामिक तत्त्वज्ञानाची तर्कशुद्ध समीक्षा केली असतां, त्यांत अनेक गोष्टींची भेसळ आढळून येईल. इतिहासाच्या कांहीं घटना निवडून आपल्या विशिष्ट मनोरथानुसार त्यांचा अर्थ लावण्याची प्रवृत्ति, बुद्धि आणि श्रद्धा यांचा समन्वय करण्याचा प्रयत्न या गोष्टींमुळें त्यांचें तत्त्वज्ञान घोंटाळयाचें वाटतें. उदाहरणार्थ, त्यांच्या लेखांतील पुढील वाक्य पहाण्यासारखें आहे : "सत्याग्रही सर्वोदयवाद ... संकुचित, सांप्रदायिक धर्माच्या मर्यादा उल्लंघून जाणारा आहे तसाच तो राष्ट्रभेदांचें व मर्यादांचें उल्लंघन करून मानवतेसंबंधींचीं कर्तव्यें अव्यभिचारी निष्ठेनें पार पाडणारा आहे.










किंबहुना या सर्वांचा समन्वय साधून त्यांना आध्यात्मिक व व्यापक मानवधर्माचें अधिष्ठान देण्यांत आलेलें आहे. " – ( पान. ३६ ).

वरील वाक्यांतील पहिलें विधान, इतिहासांत घडून आलेल्या गैरसोयीच्या वाटणाऱ्या कांहीं घटना कशा दृष्टीआड होऊं शकतात याचें उदाहरण होय. गेल्या युद्धांतील मूलभूत समस्या – लोकशाही कीं सर्वाधिकारी झोटिंगशाही – ही होती. पण त्या समस्येचें आकलन सत्याग्रही सर्वोदयवाद्यांना झालें नाहीं. स्वातंत्र्याच्या प्रीत्यर्थ, जगांतील आणि त्याबरोबरच हिंदुस्थानांतील स्वातंत्र्याचें भवितव्य सुरक्षित रहावें म्हणून तात्कालिक राष्ट्रवादी हितसंबंधांपलीकडे जाऊन दूरदृष्टीनें विचार करणें आवश्यक होतें. पण तसा विचार सत्याग्रही सर्वोदयवाद्यांनीं त्या वेळीं केला नाहीं. महायुद्धाच्या वेळीं ब्रिटिश लोकांची लोकशाही स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ उसळून आलेली प्रेरणा त्यांना समजली नाहीं. ब्रिटिश सत्ताधारी गटाची आपला ऱ्हास पावणारा साम्राज्यवाद टिकवून धरावयाची ती धडपड आहे अशी त्यांनीं गल्लत केली. याचाच अर्थ असा कीं, सत्याग्रही सर्वोदयवाद कितीहि सत्प्रवृत्त असला, तरी ऐन मोक्याच्या वेळीं त्याच्याकडून बरोबरच निर्णय घेतला जाईल याचा भरंवसा नाहीं. – आचार्यांच्या वरील उताऱ्यांतील दुसरें वाक्यहि, प्रजासमाजवादी पक्षांतील वैचारिक गोंधळाचें निदर्शक आहे. अर्थात् आचार्य जावडेकर हे प्रजासमाजवादी पक्षांत नाहींत हें खरें. व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद यांचा सर्वोदयवादांत समन्वय साधला आहे असें आ. जावडेकर म्हणतात त्याचा निश्चित अर्थ काय हें समजूं शकत नाहीं. व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद हे राजकीय वाद परस्परांपासून भिन्न व परस्पर-विसंगत आहेत. व्यक्तिवादाला सामाजिक नियंत्रणाचा जाच असह्य वाटतो. प्रत्येक व्यक्तीनें आपापलें हित साधावें, त्यांतूनच सर्वांचें हित होईल अशी व्यक्तिवादाची धारणा आहे. राष्ट्रवाद तथाकथित 'राष्ट्र' या कल्पनेला सर्वश्रेष्ठ मानून, राष्ट्रांतील जनसमूहांच्या रास्त हितसंबंधांना कःपदार्थ समजतो. राष्ट्रांतील सर्व घटकांची बेरीज म्हणजे राष्ट्र असें नसून त्या पलीकडेहि तथाकथित 'राष्ट्र' ही कांहीं वस्तु आहे असें राष्ट्रवादी मानतो. प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र राष्ट्र या कल्पनेचा चळवळया पुढाऱ्यांनीं आणि परंपरागत हितसंबंधी गटांनीं आपल्या स्वार्थाकरितां उपयोग करून घेतला आहे. राष्ट्रवादाच्या भावनेची पकड इतकी जबरदस्त आहे कीं तिच्या तावडींतून सुटणें लोकशाहीवाद्यालाहि कठिण आहे. यावर उपाय हाच कीं लोकशाहीनें माणसाच्या भौतिक गरजा तर भागविल्याच पाहिजेत पण त्याचबरोबर, व्यक्तींना आपण एकटे नाहीं, आपणांला कोणी तरी आधार आहे अशा प्रकारचें ( Sense of belonging चें) सुरक्षिततेचें भावनात्मक समाधानहि माणसाला दिलें पाहिजे. राष्ट्र या कल्पनेचा उदय होण्यापूर्वी, धर्मानें हें सुरक्षिततेचें समाधान माणसाला दिलें होतें. आतां तें समाधान धर्म देऊं शकत नाहीं. कारण, गेल्या तीनशें वर्षांतील घडून आलेल्या वैज्ञानिक संशोधनानें माणसाची विश्वाकडे पहाण्याची दृष्टीच पार बदलून गेली आहे.

म्हणून व्यक्तिवाद, राष्ट्रवाद, समाजवाद यांचा आज समन्वय करूं पहाणें म्हणजे रीनेसन्सनंतर जे कांहीं महत्त्वाचे भिन्न राजकीय विचार उदित होऊन सुस्पष्टता व वैशिष्ट्य पावले आहेत त्यांची गल्लत करणें होय. धर्म, व्यक्तिवाद, राष्ट्रवाद आणि समाजवाद यांचें मिश्रण करून त्या द्वारें समाजक्रांति होऊं शकेल हा आचार्य जावडेकरांचा वैचारिक प्रयत्न मनोरथप्राय ( wishful thinking ) आणि भाबडा वाटतो. शिवाय त्यांनीं धर्माला इतकें रंगहीन नीरस बनवून टाकलें आहे कीं, त्यामुळें त्यांचा हा प्रयत्न अर्धवट बुद्धिवादी व अर्धवट श्रद्धावादीहि वाटतो. त्यामुळें तो धड सुशिक्षितांनाहि पटणार नाहीं व अशिक्षित जनतेलाहि आकर्षक वाटणार नाहीं. जनतेला तत्त्वज्ञानाच्या निर्गुण, निराकार कल्पना केव्हांहि पटत नसतात. मानववंशशास्त्राप्रमाणें धर्माला मानवाच्या जीवनांत जें वासनात्मक अधिष्ठान आहे, त्याच्या बुडाशीं जावडेकर आणि गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें धार्मिकता किंवा आपल्या निर्मात्याला जाणून घेण्याच्या इच्छा ही नसून, अज्ञाताची माणसाला वाटणारी भीति आणि आपण व आपला वंश टिकून रहावा ही सहजप्रेरणा या गोष्टी धर्माच्या बुडाशीं आहेत. विज्ञानानें अलीकडे जें विश्वाचें ज्ञान करून दिलें आहे त्यामुळें साहजिकच धर्माची मानवी मनावरील पकड हळूं हळूं शिथिल होत गेली आहे. असें असतांना, धर्माला

पुन्हां प्रतिष्ठा प्राप्त करून देणें हें फलज्योतिषाला व किमयेला पुन्हां शास्त्राची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासारखा उलटा प्रयत्न होय. असा प्रयत्न करण्यानें धार्मिक वेडगळ समजुती लोकमानसांत अधिकच मूळ धरून बसण्याचा संभव आहे.

लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांना ज्या प्रश्नाला तोंड द्यावयाचें आहे त्याचीं दोन अंगें आहेत. एक म्हणजे, त्यांनीं अशा एका तत्त्वज्ञानाची मांडणी करून दाखविली पाहिजे कीं, ज्यामुळें व्यक्तीच्या जीवनाला बाहेरच्या कोणत्याहि शक्तीचें साधन बनावें न लागतां व्यक्ति म्हणून अर्थ व महत्त्व प्राप्त होईल. त्यांतूनच, मानवाला 'मानदंड' मानून मानवतावादी नीतिशास्त्राची मांडणी करतां आली पाहिजे. दुसरें म्हणजे, लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांना अशी एक व्यवहार्य समाजसंघटना सुचवितां आली पाहिजे कीं, ज्या संघटनेमध्यें नांदणाऱ्या सामान्य नागरिकाला, आधुनिक विज्ञानानें उपलब्ध करून दिलेल्या सुखसोयींना मुकावें न लगतां लोकशाही मूल्यें आपल्या दैनंदिन जीवनांत आणतां येतील. नुसता उपदेश करून – मग तो उपदेश करणारा केवढा मोठा संत असेना का–, कांहीं होणार नाहीं.

तथापि आचार्य जावडेकर आपल्या लेखांत असें प्रतिपादन करतात कीं गांधीवादानें लोकशाहीचे प्रश्न सुटतील एवढेंच नव्हे तर ते प्रश्न सोडविण्याचा गांधीवाद हाच एकमेव उपाय असून, राजकीय नेत्यांकडून– विशेषतः आशियामधील नेत्यांकडून– त्याला अधिकाधिक मान्यता मिळत आहे. ते म्हणतातः "मानवी जीवनांत व समाजांत सर्वांगीण क्रान्ति घडवून आणूं पहाणारा मार्क्सवाद किंवा क्रान्तिकारी समाजवाद आणि गांधीवाद किंवा सत्याग्रही सर्वोदयवाद अशीं हीं दोन जीवनदर्शनें असून त्यांपैकीं पहिलें हें धर्मभावनेला व आत्मप्रेरणेला मारक तर दुसरें त्यांना तारक व उद्धारक आहे" (पान ३६). "आशियांतील राष्ट्रविधात्यांमध्यें आणखी एक वर्ग आहे. त्याचें असें मत आहे कीं धर्मभावना ही केवळ प्रतिक्रांतिकारक भावना नसून ती क्रांतिकारक व पुरोगामी अशीहि बनू शकते." (पान ३३).

वरील उताऱ्यांत ज्या गोष्टींचा उल्लेख केला आहे त्या वादग्रस्त आहेतच. त्या शिवाय इतर अनेक गोष्टी आ० जावडेकरांनीं दृष्टीआड केल्या आहेत. आचार्यांनीं पश्चिम युरोपमधील इंग्लंड, हॉलंड, डेन्मार्क, स्कँडिनेव्हिअन देश यांची दखल घेतलेली दिसत नाहीं. ह्या देशांना मार्क्सवाद संमत नाहीं किंवा गांधीवादासारखें तत्त्वज्ञानहि संमत नाहीं. तरीसुद्धां गेलीं कित्येक वर्षें या देशांतून नागरिकजीवनाची लोकशाही पद्धतीनें बांधणी करण्याचा प्रयत्न चालू असून त्यांत व्यक्तीला सुरक्षिततेची व स्वतःच्या विकासाकरितां वाढत्या स्वातंत्र्याची शाश्वती बरीचशी मिळाली आहे. – शिवाय आ० जावडेकरांना दुसरें असें विचारावेसें वाटतें कीं, आशियांत असा कोणता देश आहे कीं ज्यांतील नेत्यांना आचार्यांप्रमाणें धर्म ही एक विमोचक व क्रान्तिकारक शक्ति वाटते ? चीन का जपान का ब्रह्मदेश का इंडोनेशिया ? ईजिप्त का तुर्कस्तान ? का सीलोन कीं पाकिस्तान ? — आचार्यांच्या मनांत बहुधा भारत देश असावा. पण भारतांत सत्ताधारी पक्षानें गांधीवादाचा व्यवहारांत तरी पूर्णपणें त्याग केला आहे. गांधीवादाचें निष्ठापूर्वक आचरण करण्याचा प्रयत्न करणारे धैर्यशाली –पण किंचित् तऱ्हेवाईक–असे मूठभर भूदान-कार्यकर्ते आहेत हें खरें. पण त्यांच्यावर भिस्त ठेवून गांधीवादाबद्दल व धर्माच्या क्रान्तिकारक शक्तीबद्दल आशा बाळगणें हें कोंबडीनें अंडीं घालण्यापूर्वींची तिच्या पिलांची जाहिरात करण्यासारखें जरा अकालीं, घाईचेंच होत नाहीं काय ?

आपल्या आध्यात्मिक प्रज्ञेचा गाजावाजा न करितां स्कँडिनेव्हिअन देश ज्याप्रमाणें आपला मार्ग क्रमीत आहेत त्याचप्रमाणें आपण देखील किंचित् त्यांच्यासारखाच पण आपला विशिष्ट मार्ग काढला पाहिजे. आधुनिक विज्ञानानें जी अपरिमित उत्पादनशक्ति उपलब्ध करून दिली आहे, तिचा तर आपण आपल्या गरजांप्रमाणें उपयोग करून घेतला पाहिजेच. त्याशिवायहि आधुनिक विज्ञानानें मानवी मनाला बंधमुक्त करणारा जो शास्त्रीय दृष्टिकोन निर्माण केला आहे तोहि आपण आत्मसात् करून घेतला पाहिजे. तो तसा घेतांना आपल्या सांस्कृतिक परंपरेंतील निर्दोष असा भाग ठेवावयास हरकत नाहीं. पण हें साधावयाचें तर आचार्य जावडेकर ज्या प्रकारचा रूक्ष, रंगरूपहीन धर्म सांगतात त्याचा कांहींहि उपयोग नाहीं.










श्री. गं. दे. खानोलकर

# विश्वकवि रवीन्द्रनाथ ठाकूर

लंडनमध्यें एका चित्रकाराच्या खोलींत कवितांचें वाचन चाललें होतें. निवडक अशी रसिक मंडळी जमली होती. कवि, चित्रकार, कथालेखक, नाटककार, साहित्याचे चाहते अशी मंडळी होती. ती. रवीन्द्रनाथांचे एक चाहते चित्रकार रोदेन्स्टाइन यांच्या आमंत्रणावरून ही मंडळी जमली होती. विख्यात आयरिश कवि डब्लु. बी. यीट्स यांचेखेरीज बहुतेक सारे इंग्रजच होते. रवीन्द्रनाथ व त्यांची कविता यांचा परिचय करून देण्याकरितां रोदेन्स्टाइननें या मंडळीला मुद्दाम पाचारण केलें होतें. रोदेन्स्टाइनबरोबरच यीट्सचाहि त्यांत पुढाकार होता. या बैठकींत रवीन्द्रनाथांच्या कवितांचा इंग्रजी अनुवाद तोच भावोद्दीपक आवाजांत तन्मयतेनें वाचून दाखवीत होता. 'गीतांजलीं'तील कविता होत्या त्या :

" प्रकाश ! प्रकाश ! विश्वांत भरून राहणारा प्रकाश, नेत्रांचें चुंबन घेणारा प्रकाश, हृदयांत माधुर्य उत्पन्न करणारा प्रकाश !!

अहाहा ! माझ्या जिवलगा ! हा प्रकाश माझ्या जीवितांत नृत्य करीत आहे; हाच प्रकाश माझ्या लाडक्या, माझ्या प्रेमरूपी वीणेच्या तारांवर आघात करीत आहे. या प्रकाशाच्याचमुळें आकाशावरील पडदा दूर होतो, वारा मोठ्या वेगानें स्वच्छंद वाहतो आणि सर्व पृथ्वीभर हास्य पसरतें.

प्रकाशाच्या समुद्रावर फुलपांखरें आपलीं शिडें पसरितात. कमळिणी व जाईचीं फुलें त्याच प्रकाशाच्या लाटांवर तरंगत राहतात. माझ्या लाडक्या ! प्रत्येक ढगावर या प्रकाशाचा आघात होऊन तें सुवर्णमय चूर्ण पसरतें आणि तोच प्रकाश असंख्य रत्नें सर्व आभाळावर उधळितो.

माझ्या प्रियकरा ! प्रत्येक पानापानाच्या ठिकाणीं हर्ष पसरला जावून जिकडे तिकडे आनंदी आनंद भरून राहिला आहे. स्वर्णदीनें आपल्या दोन्ही थडी बुडवून टाकल्या आहेत आणि जिकडे तिकडे आनंदाचा पूर लोटला आहे. "

* * *

" लहान बालकाच्या डोळ्यांवर हां हां म्हणतां येणारी झोंप ही येते तरी कुठून ? कुणाला कळलें आहे का ? – होय. असें ऐकलें आहे कीं, अप्सरांच्या एका गांवाजवळ एक दाट उपवन आहे. ज्यांत सदैव गुडुप अंधार असून काजव्यांच्या अंधुक प्रकाशानें मात्र जें उजळलेलें राहतें, आणि जेथें मोहमायेच्या दोन नाजुक कळया लटकत असतात, अशा त्या ठिकाणीं बालकांच्या झोपेचें वसतिस्थान असून, तेथून ती नेत्रांचें चुंबन घेण्याकरितां येत असते.

बालक झोंपलें असतां त्याच्या चिमकुल्या कोंवळया ओठांवर जें मंद मधुर स्मित झळकत असतें, त्याचा जन्म कुठें झाला, माहित आहे का ? – हो, आहे. असें ऐकलें आहे कीं, एक चन्द्रकोर होती. तिच्यांतून बाहेर पडलेल्या, नूतन पालवीप्रमाणें अति कोमल असलेल्या किरणानें वर्षाकालांतील अंतर्धान पावणाऱ्या मेघाच्या अंगाला स्पर्श केला. त्या वेळीं दहिंवरानें न्हालेली उषा स्वप्नें पहात होती. आणि अशा त्या ठिकाणीं बालकाच्या मंद मधुर स्मिताचा जन्म झाला.

लहान बालकाच्या लुसलुशीत अवयवांवर स्निग्ध, मधुर व अभिनव अशी जी कान्ति दृष्टीस पडते, ती इतके दिवस कुठें गुप्त होऊन राहिली होती, ठाऊक आहे कुणाला ? हो. त्या बालकाची आई जेव्हां छोटुकलीशी होती, तेव्हांपासूनच स्निग्ध, मुग्ध, गूढ अशा प्रेमाच्या रूपानें तिच्या हृदयांत ती कान्ति भरून राहिली होती. "[1]

परदेशी समाजासमोर परदेशी भाषेंत गद्यस्वरूपांत कविता वाचली जाण्याचा तो पहिलाच प्रसंग

लेखकाच्या 'विश्वकवि रवीन्द्रनाथ' या आगामी विस्तृत जीवनकथेंतील एक प्रकरण.

१ अनुवाद : गोविंद वासुदेव कानिटकर.








होता. कवितांतील भावना व कल्पना श्रोत्यांना अगदीं नवीन होत्या. नेहमींहून कांहींतरी अपूर्व असें आपण ऐकतों आहों, असें त्यांना क्षणोक्षणीं वाटत होतें.

वाचन संपलें. रवीन्द्रनाथांनीं भोंवतीं पाहिलें. सर्वच स्तब्ध होते.

रवीन्द्रनाथ गोंधळले; किंचित् पस्तावल्यासारखें त्यांना वाटलें. 'आवडली नसावी बहुधा यांना माझी कविता. कदाचित् कळलीहि नसेल. नको पडायला होतं मी या फंदांत.' असेंहि त्यांना क्षणभर वाटलें.

पण ती स्तब्धता कविता न आवडल्याची निदर्शक नव्हती. कवितांतील हळुवार भावना व भव्योदात्त कल्पना यांमुळें श्रोत्यांचीं अंतःकरणें मुग्ध होऊन गेलीं होतीं. कवीचा कोणत्या शब्दांत गौरव करावा हें श्रोत्यांना कळेना. ते स्तिमित झाले होते.

बैठकींतून बाहेर पडल्यावर मंडळीपैकीं कांहींजणांनीं रवीन्द्रनाथांकडे आपल्या भावना व्यक्त केल्या. अत्यंत आदरपूर्वक त्यांनीं त्यांचा गौरव केला. **दीनबंधु सी. एफ्. ॲण्ड्र्यूज** व '**एव्हरीमन**' ग्रंथमालेचे संपादक **अर्नेस्ट-व्हाइस** हे दोघे त्यांपैकीं प्रमुख होते.

'गीतांजलीं'तील त्या कवितांनीं ॲण्ड्र्यूजच्या अंतःकरणाचा ठावच घेतला होता. रवीन्द्रनाथ बैठकींतून बाहेर पडतांच त्यांचे मागोमाग ते निघाले. रवीन्द्रनाथांशीं किती किती बोलूं, असें त्यांना झालें होतें.

बाहेर शुभ्र रुपेरी चांदणें पडलें होतें. वृक्ष-वेलींवरून, लता-पल्लवांवरून आकाशांतील तो अमृतरस सारखा ओतत होता. सारी सृष्टि स्तब्ध होती; विलक्षण गोड तंद्रींत ती होती.

त्या फेनधवल चांदण्यांत रवीन्द्रनाथ आणि ॲण्ड्र्यूज खूप खूप हिंडले, खूप खूप बोलले. ॲण्ड्र्यूजच्या अंतःकरणांतील भक्तिभावाला उधाण आलें होतें त्या रात्रीं.

ॲण्ड्र्यूज, रोदेन्स्टाइन, यीट्स, अर्नेस्ट व्हाइस यां-सारख्यांच्या तोंडून वारंवार निघणाऱ्या प्रशंसोद्गारां-मुळें लंडनमधील साहित्यप्रेमी मंडळींत रवीन्द्र-काव्या-बद्दल जिज्ञासा वाढूं लागली. कवीला अल्पोपहाराचीं आणि भोजनाचीं निमंत्रणें येऊं लागलीं. तत्कालीन साहित्यिकांशीं कवीच्या ओळखी वाढूं लागल्या. स्टॉफर्ड ब्रुक, मेसफील्ड, रॉबर्ट ब्रिजीस, हेन्री ब्रॅड्ले, बर्नार्ड शॉ, एच्. जी. वेल्स, जॉन गाल्सवर्दी, एझ्रा पाउंड, यीट्स् यांसारख्या प्रथम श्रेणींतील साहित्यिकांशीं त्यांचा परिचय घडून आला. यीट्स्‌ला तर रवीन्द्रनाथांची कविता स्वतःच्या काव्यकलेला नवीन स्फूर्ति देणारी वाटली. तो या काळांत वेणुगीतें ( Lyrics ) रचण्यांत गढलेला असे.

रवीन्द्रनाथांच्या लंडनमधील या वेळच्या आगमनाला रोदेन्स्टाइनचीच उत्सुकता कारण होती. कलकत्यांत प्रसिद्ध होणाऱ्या 'मॉडर्न रिव्ह्यु' या मासिकाच्या एका अंकांत त्यानें रवीन्द्रनाथांची एक लघुकथा वाचली. या कथेनें मोहित होऊन त्यांच्याशीं परिचित असलेले रवीन्द्रनाथांचे एक चित्रकार पुतणे गगनेन्द्रनाथ टागोर यांस पत्र लिहून, 'लेखकानें अशा आणखी कांहीं कथा लिहिल्या आहेत काय' अशी पृच्छा केली. या पत्राचें उत्तर म्हणून त्याजकडे एक वही धाडण्यांत आली. या वहींत रवीन्द्रनाथांचे शांतिनिकेतनमधील एक सहकारी शिक्षक अजित चक्रवर्ती यांनीं इंग्रजींत अनुवादित केलेल्या रवीन्द्रनाथांच्या कांहीं कविता होत्या. कथे-पेक्षांहि उच्च व गूढ अनुभूतीनें भरलेल्या अशा ह्या कविता होत्या. त्या वाचून रोदेन्स्टाइन मुग्ध झाला. रवीन्द्रनाथांचा साक्षात् परिचय करून घेण्याची व त्यांचें आणखी लेखन वाचण्याची त्याची उत्सुकता अधिकच वाढली. कवितांचा इंग्रजी अनुवाद जरी तितकासा सफाईदार साधला नव्हता तरी त्यांतील विचारांचें वैभव व कल्पनांचें सौंदर्य त्याला असामान्य वाटलें. याच सुमारास कुचबिहारच्या राजघराण्यांतील एक साधुवृत्तीचे ब्राह्मभक्त प्रमथलाल सेन व कलकत्ता विद्यापीठांतील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक डॉक्टर **ब्रजेन्द्र-नाथ सील** यांचेशीं त्यांची भेट झाली. या भेटींत रवीन्द्रनाथ आणि त्यांचें वाङ्मय यासंबंधीं त्याला पुष्कळच माहिती मिळाली. वास्तविक, दोन वर्षांपूर्वीं ( १९१०-११ ) रोदेन्स्टाइन भारतांत भारतीय शिल्प व चित्रकला यांचा परिचय करून घेण्याकरितां भ्रमण करीत असतां, भारतीय कलेचा एक थोर चाहता व त्याच्या पुनरुज्जीवनासाठीं तळमळीनें चळवळ चालवि-णारा हॅवेल याच्या ओळखीनें कलकत्यास टागोर-कुटुंबांत येऊन राहिला होता. शिल्पकार गगनेन्द्रनाथ व चित्रकार अवनीन्द्रनाथ हे त्याचे स्नेही बनले होते. या टागोरद्वयांशीं त्याच्या जेव्हां 'साहित्य – संगीत – कला'विषयक गप्पा चालत, तेव्हां त्या ठिकाणीं, ओंठावर सदा स्मित झळकत असलेली, अबोल आणि

शांत वृत्तीची, सुंदर आणि तेजस्वी चेहऱ्याची, रेखींव बांध्याची, साधाच पण आकर्षक पद्धतीनें पोशाक केलेली एक व्यक्ति बसत असे. गप्पांत ही व्यक्ति कधीं भाग घेत नसे, पण मोठ्या कुतूहलानें मात्र ती ऐके. ही व्यक्ति या टागोरद्वयांचा चुलता आहे एवढेंच रोदेन्स्टाइनला माहित होतें. या चुलत्याचा परिचय पुतण्यांनीं कांहीं कधीं करून दिला नाहीं आणि रोदेन्स्टाइननेंहि इंग्रजांच्या स्वभावाप्रमाणें स्वतः होऊन करून घेतला नाहीं. ' मॉडर्न रिव्ह्यू 'मधील कथा वाचून ज्या व्यक्तीचा परिचय व्हावा म्हणून तो अत्युत्सुक झाला होता, ती व्यक्ति म्हणजे त्या बैठकींतील ती स्मितमुखी अबोल व्यक्तीच, हें जेव्हां त्याला टागोरबंधुद्वयांकडून कळलें तेव्हां तर त्याच्या उत्सुकतेला सीमाच राहिली नाहीं. प्रमथलाल सेन आणि डॉ. ब्रजेन्द्रनाथ सील यांना त्यानें रवीन्द्रनाथांना लंडनला बोलवून घेण्याबद्दल फारच आग्रह चालविला. या दोघांनींहि मग रवीन्द्रनाथांना लिहिलें कीं, " तुम्ही इकडे कांहीं दिवसांकरितां याल तर फार चांगलें होईल. रोदेन्स्टाइनच्या घरीं आणि अन्यत्र तुमच्यासारख्याच प्रवृत्ती व आवडी असलेले अनेक लोक तुम्हांला भेटतील. तुम्हांला खूप आनंद वाटेल त्यांच्या सहवासांत. त्यांना तुमच्यांत व तुम्हांस त्यांच्यांत कांहीं तरी नवीन आढळेल. परस्परांचा परस्परांशीं परिचय झाल्यानें उभयपक्षीं कांहीं तरी चांगलेंच घडेल असें आम्हांला वाटतें; तरी तुम्ही इकडे याल तर फार बरें होईल. " हें पत्र गेलें त्या सुमारास रवीन्द्रनाथांच्या मनांत विलायतेस जाण्यासंबंधींचा विचार घोळतच होता. या पत्रामुळें तो विचार निश्चित झाला. ते आपला मुलगा व दोन स्नेही यांसमवेत १९१२ च्या मे महिन्यांत लंडनला जावयास निघाले. विलायतच्या वाटेवर त्यांनीं स्वतःच आपल्या निवडक गीतांचा इंग्रजींत अनुवाद केला. आणि लंडनला आल्यावर रोदेन्स्टाइनला जेव्हां ते भेटावयाला गेले तेव्हां या अनुवादात्मक गीतांची वही त्यांनीं त्याच्या हातांत दिली. या वहींतील गीतसमुदाय ' गीताञ्जलि ' या नांवानें पुढें विश्वविख्यात झाला.

विलायतेस जावयास निघण्याच्या आधीं कांहीं दिवस हवापालटाकरितां म्हणून ते शिलाइदा येथें जाऊन राहिले होते. तेथें असतां विरंगुळा म्हणून ' गीताञ्जली'तील गीतांचा त्यांनीं इंग्रजींत अनुवाद करावयास घेतला. रवीन्द्रनाथांनीं आपली एक पुतणी इंदिरादेवी चौधरी हिला लिहिलेल्या एका पत्रांत या अनुवादलेखनाची पुढीलप्रमाणें कथा सांगितली आहेः[२]

" गीताञ्जलीच्या इंग्रजी भाषान्तराविषयीं तूं विचारलें आहेस. पण खरें पाहिलें तर तिचें भाषान्तर मी कां केलें किंवा लोकांना ती इतकी कां आवडली, याविषयीं मी अद्याप विचार केलेला नव्हता. आपल्याला नीट इंग्रजी लिहितां येत नाहीं, म्हणून मला कधीं विषाद वाटला नाहीं, परंतु भीति मात्र वाटायची. ती इतकी कीं, इंग्रजींतून एखादें चहाचें आमंत्रण आलें तरी त्याला उलट उत्तर घालणें देखील माझ्या अगदीं जिवावर येई. गेल्या वेळीं परदेशगमनाची सर्व तयारी होऊन आतां जहाजांत पाय ठेवणार तोंच माझें डोकें दुखूं लागल्याचें तुझ्या लक्षांत असेलच. त्या वेळीं जाण्याचा बेत जरासा लांबणीवर टाकून मी शिलाइदा येथें विश्रांति घेण्याकरितां गेलों. पण रिकामटेकड्या मनाला स्वस्थता कसची मिळणार ? तेव्हां चित्तवृत्ति स्थिर रहावी म्हणून अगदीं अभावितपणें एक काम हातीं घेतलें. चैत्रमासाचे ते दिवस. आम्रमंजरीच्या सुवासानें दशदिशा दरवळित होऊन, पक्ष्यांच्या किलबिलाटानें तर सर्व दिवसाला कशी प्रफुल्लता येई ! या वेळची माझी स्थिति एखाद्या बालकासारखी झाली होती. चांगल्या स्थितींत असतांना, मूल आईच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करतें. पण आजारी पडतांच मात्र तिला तें इतकें बिलगून बसतें कीं, त्यांतून तिची मुक्तता होणें कठीण. मी देखील कायावाचामनेंकरून या चैत्रमासाशीं इतका समरस झालों होतों, कीं त्याचा प्रकाश, हवा आणि ग्रंथ हीं माझींच रूपें आहेत कीं काय असा मला भास झाला.

" परंतु या स्थितींत स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. इंदिरे, तुला माहीतच आहे , निसर्गाच्या सान्निध्यांत माझी कळी कशी उमलते ती. आणि एकदां ही प्रफुल्लता आल्यावर असें वाटतें कीं, किती लिहूं आणि

२ " मी ' गीताञ्जली'चा इंग्रजी अनुवाद कसा केला ? " ' विचित्रा ' ( बंगाली मासिकांतून )– अनुवादक : वि. अं. गिजरे, ' प्रतिभा ' पाक्षिक, ८ जून १९३४.













किती नाहीं! पण कंबर कसून कांहीं नवीन लेखन करण्याइतकी ताकत यावेळीं माझ्यांत नव्हती. म्हणून 'गीताञ्जलि' घेऊन, तिच्यांतील एकेका गीताचा अनुवाद करण्यास प्रारंभ केला. कदाचित् तूं विचारशील 'अंग इतकें तापानें फणफणत असतांना हें काम हातीं घेण्याची बुद्धि झाली तरी कशी तुम्हांला?'. पण यावर मला तुला एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं, आपण कांहीं बहादुरी करीत आहों, या भावनेनें कांहीं मी या कामाला हात घातला नाहीं. परंतु एके दिवशीं ज्या भावनांनीं उत्तेजित होऊन 'गीताञ्जलि' निर्माण झाली, त्यांचेंच आविष्करण अन्य भाषेंत करतांना मात्र, माझ्या अंतःकरणाला अतिशय गुदगुल्या होत होत्या. लवकरच एक लहान वही भरली-सुद्धां. तीच खिशांत घातली आणि बोटींत पाऊल टाकलें. आतां तूं म्हणशील कीं, खिशांतच कशाला ठेवावयाला हवी होती वही. तर त्याला उत्तर असें कीं, मनाला जर बरें वाटलें नाहीं, तर डेकवर बसून आणखी एकदोन गीतांचें भाषांतर करावें असा विचार होता, आणि घडलें देखील अगदीं तसेंच.

"माझी कविकीर्ति एका हिंदी मित्राकडून, अगोदरच रोदेन्स्टाईन् यांच्या कानांपर्यंत गेली होती. एकदां बोलतां बोलतां, माझी कविता पहाण्याची इच्छा त्यांनीं प्रगट केली. तेव्हां नाइलाजानें या दोन्ही वह्या मी त्यांच्या स्वाधीन केल्या. त्यांनीं प्रदर्शित केलेल्या अभिप्रायावर तर प्रथमतः माझा विश्वासच बसेना. नंतर त्यांनीं यीट्स् यांच्याकडे त्या दोन्ही वह्या पाठवून दिल्या. पुढील इतिहास तर जगाला विदितच आहे. माझी ही कैफियत वाचून माझा यांत कांहींच अपराध नव्हता हें तुला कळून येईल. केवळ दैवयोगानेंच सगळ्या गोष्टी घडून आल्या, असें म्हटलें पाहिजे."

रवीन्द्रनाथांच्या 'गीताञ्जली'तील गीतें ज्यांनीं ज्यांनीं ऐकली त्यांच्या त्यांच्याकडून, तीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं पाहिजेत असा आग्रह होऊं लागला. रोदेन्स्टाइन आणि यीट्स् यांनीं त्यांच्या प्रकाशनाची खटपट करण्याचें ठरविलें. 'इंडिया सोसायटी' या संस्थेतर्फे खासगी प्रसारासाठीं 'गीताञ्जली'च्या मोजक्याच प्रती छापून घेण्यांत आल्या. यीट्स्नें अति सुंदर, मार्मिक अशी परिचयात्मक प्रस्तावना (ऑगस्ट १९१२) लिहिली. यीट्स्च ती लिहूं जाणे.[३]

रोदेन्स्टाइनची इच्छा 'गीताञ्जली'ला अधिक प्रसिद्धि मिळावयाला हवी, अशी होती. तिचा खासगी मर्यादित प्रसार आणि विवक्षित वर्तुळांतच होणारी प्रशंसा यानें त्याला समाधान वाटत नव्हतें. 'गीताञ्जली'ची सुरेख पण स्वस्त आवृत्ति निघावयाला हवी असें त्याला वाटत होतें. मॅक्मिलन कंपनीचा त्यावेळचा प्रमुख कारभारी आणि सूत्रधार जॉर्ज मॅक्मिलन याला त्याबद्दल त्यानें शब्द टाकला. त्यानें प्रारंभीं थोडेसे आढेवेढेच घेतले; पण रोदेन्स्टाइनच्या आग्रहामुळें 'गीताञ्जलि' प्रकाशित करण्याचें मान्य केलें. भीतभीतच झालेला हा व्यवहार, पुढें लेखक व प्रकाशक यांचे संबंध अधिक गाढ होऊन, उभयपक्षीं कल्पनातीत फायदेशीर ठरला. मॅक्मिलन्स हे रवीन्द्रनाथांच्या इंग्रजी पुस्तकांचे कायमचे प्रकाशक बनले.

'गीताञ्जलि' प्रकटपणें प्रसिद्ध झाल्यावर तिचा काव्यसमीक्षकांकडून अपेक्षेपलीकडे गौरव झाला. लंडनच्या 'टाइम्स लिटररी सप्लिमेन्ट'नें तर खूपच प्रशंसा केली. या प्रशंसेचा 'गीताञ्जली'च्या प्रसारावर फार मोठ्या प्रमाणांत अनुकूल परिणाम झाला. पुस्तकाचा खप सारखा वाढत होता. रवीन्द्रनाथांचा चाहता वर्गहि त्याच प्रमाणांत एकसारखा वाढूं लागला.

रवीन्द्रनाथांच्या लौकिकाला भरती आली होती. १९१३च्या नोव्हेंबरांत तर ती शिगेला पोंचली. एकोणिसशेंतेरा सालच्या नोव्हेंबरमधील एका संध्याकाळीं शान्तिनिकेतनमध्यें अनपेक्षितपणें एक तार येऊन थडकली! रवीन्द्रनाथ इग्लंड-अमेरिकेचा प्रवास आटोपून बोलपूर येथील आपल्या आश्रमांत नुकतेच परतले होते. 'गीताञ्जली'ला नोबेल पारितोषिक मिळाल्याची सुवार्ता त्या तारेनें आणली होती. भारताला विस्मयचकित करून सोडणारी ती मंगल वार्ता होती. बंगालच्या बाहेर भारतांतील इतर प्रांतांतील लोकांना

३ रॉबर्ट ब्रिजीसनें यीट्सला लिहिलेल्या एका पत्रांत पुढील उद्गार काढले आहेत : "Binyon brought us Tagore's poems with your lovely preface. What a delight it was! Oh, most blessed one! There is no one but you who could write so."—'W. B. Yeats' by Joseph Hone, page 263.








रवीन्द्रनाथांचें नांव वा कर्तृत्व फारसें माहित नव्हतें. लोक एकमेकांना विचारूं लागले कीं, 'कोण हा रवीन्द्रनाथ टागोर? काय लिहिलें आहे आणखी त्यानें?' बंगाली लोक परस्परांत विस्मयमिश्रित अभिमानानें बोलूं लागले: 'रोबी ठाकूर! आमचा कवि रोबी ठाकूर! उगीच नाहीं आमचा सोनार् बाँगला! अशी थोर काव्यप्रतिभा तिथेंच उदित व्हावयाची.'

नोबेल-पारितोषिकाची वार्ता ऐकून भारतांतूनच काय पण युरोप-अमेरिकेंतूनहि अभिनंदनपर पत्रांचा व तारांचा रवीन्द्रनाथांच्या टेबलावर नुसता वर्षाव होऊं लागला. ज्यांनीं त्यांची कधीं एक ओळहि वाचली नव्हती, नव्हे जे त्यांच्याशीं सहसा कधीं स्नेहभावानें वागलेहि नाहींत, अशांनीं तर त्यांची तोंड फाटेपर्यंत स्तुति चालविली. रोदेन्स्टाइनला लिहिलेल्या एका पत्रांत रवीन्द्रनाथ म्हणतातः "खरोखरी हे लोक माझा (रवीन्द्रनाथ या व्यक्तीचा) सन्मान करीत नसून, मला मिळालेल्या सन्मानाचा सन्मान करीत आहेत."

कवि व त्याचें काव्य यांच्याशीं परिचय व्हावा यासाठीं आतां प्रांतोप्रांतीं, देशोदेशीं उत्कंठा वाढूं लागली.

कवि दिसतो कसा, बोलतो कसा, लिहितो कसा, राहतो कसा हें जाणून घेण्यासंबंधींच्या उत्सुकतेला उधाण आलें.

कविजीवनांत एक थोर अपूर्व प्रभात उदेली होती!

---

## कालिदास आणि रवीन्द्रनाथ

कालिदासानंतर भारताच्या संस्कृतीचा इतका उदात्त व कलात्मक आविष्कार रवींद्रनाथांखेरीज कोणीहि केला नाहीं असें निःशंकपणें म्हणतां येईल. या देशांत तुळसीदास, ज्ञानदेव, कबीर यांच्यासारखे महाकवि होऊन गेले. पण ते संतकवि होते. धर्मजागृति हें त्यांच्या काव्याचें अधिष्ठान होतें. परंतु मानवी जीवनांतील सौंदर्य आणि शुचिता यांचा सुंदर आविष्कार कालिदासानंतर इतक्या वर्षांनीं रवींद्रनाथांनींच केला.

— आचार्य विनोबा

'अभय आश्रमां'त केलेल्या भाषणांतून (५।२।५५).

## वैराग्य

गंभीर रात्रींचा समय. संसाराविषयीं विरक्त होऊन विरागी म्हणाला: "माझ्या इष्टदेवाकरितां आज मी घर सोडून देणार! (पण) कोण मला भुलवून येथें रोखून ठेवतें आहे बरें?" ईश्वर म्हणाला: "मी" विराग्यानें तें ऐकलें नाहीं.

झोंपलेल्या बाळाला कुशींत घेऊन शय्येवर एका बाजूला त्याची प्रेयसी स्वस्थ निजली होती. विरक्त उद्गारला: "हें मायाजाळ! काय बरें असावें हें?" ईश्वर म्हणाला: "मी." विराग्यानें ऐकलें नाहीं.

शय्येवरून उठून विराग्यानें हांक मारली: "प्रभो, तूं कोठें आहेस?" ईश्वर म्हणाला: "येथेंच." तरीहि विराग्यानें ऐकलें नाहीं.

बाळ मातेच्या कुशींत शिरून झोंपेंत रडत होतें. ईश्वर म्हणाला: "फिर मागें." विराग्यानें ही वाणी ऐकिली नाहीं.

ईश्वरानें निःश्वास सोडून म्हटलें: "हाय्! मला सोडून हा भक्त कोठें चालला?"

— रवीन्द्रनाथ ठाकूर

(मूळ बंगाली काव्यावरून अनुवादित.)

---

## दुर्लभ जन्म!

हें सर्व पाहिलेलें एक दिवस समाप्त होणार! एक दिवस हे नयन शेवटचेच मिटणार!

(पण) दुसऱ्या दिवशीं आजसारखीच रात्रीची पहाट होईल. जागृत होणाऱ्या जगावर प्रभात जागृत होईल. संसाराचा खेळ कलरव करीत असाच चालूं राहील. घरोघर सुखदुःखांत काळ निघून जाईल.

या गोष्टीचें स्मरण होऊन मी आज सगळीकडेच उत्सुक नयनांनीं पहात आहे. जें जें कांहीं नयनांना दिसत आहे तें तें दुर्लभ हें मनांत येउन, तुच्छ असें कांहींच वाटत नाहीं. या धरणीवरील क्षुल्लकांतलें क्षुल्लक स्थान, या जगांतील क्षुद्रांतला क्षुद्र जीव दुर्लभ आहे.

जें मिळालें नाहीं तें राहो बापडें! पण जें मिळालें पण तुच्छ म्हणून ज्याच्याकडे पाहिलें नाहीं तें मला दे.

— रवीन्द्रनाथ ठाकूर

(मूळ बंगाली काव्यावरून अनुवादित)

---

४ 'Men and Memories' Vol. II by Rothenstein, Page 282.








# तिलकयशोऽर्णवः ।

[ बिहारचे माजी राज्यपाल लोकनायक **डॉ. माधव श्रीहरि अणे** यांनीं **लोकमान्य बाळ गंगाधर टिळक** यांच्यावर '**तिलकयशोऽर्णवः**' या नांवाचें एक संस्कृत महाकाव्य रचावयाचें योजिलें असून, सुमारें चौदा सर्गापर्यंत त्याची रचना झाली आहे. त्यांतील आरंभींच्या मंगलाचरणांतील कांहीं श्लोक खाली उद्धृत केले आहेत. टिळकपुण्यतिथीच्या निमित्तानें आपल्या महाकाव्यांतील कांहीं श्लोक उद्धृत करून दिल्याबद्दल **डॉ. मा. श्री. अणे** यांचे मनःपूर्वक आभार —का. सं. ]

नत्वा रामचरित्रगाननिपुणं **वाल्मीकिमाद्यं** कविं
**व्यासं** पंचमवेद एव सुमुखाद्यस्याऽऽविरासीद् भुवि ।
चन्द्रार्काविव शोभिनौ कविगणाकाशे प्रकाशप्रदौ
तावाद्यौ कविपुंगवौ मम कृतेः सिद्ध्यै मुहुः प्रार्थये ॥

सृष्टिर्येन विनिर्मिता सुललिता गीर्वाणकाव्यात्मिका
वाचोऽलंकृतिरम्यहर्म्यनिवहैर्या शोभतेऽहर्निशम् ।
यत्र स्वादुरसापगा नवमुखैर्वाचां विशत्यर्णवम्
वन्देऽहं कविराजमंडलगुरुं तं **कालिदासाव्हयम्** ॥

लीलोत्तुंगतरंगचित्रलहरीनाद्येन संशोभितो
यस्मिन् नाशयति प्रबोधवडवावह्निस्तमोऽज्ञानजम् ।
विद्यारत्नमयः पराक्रममहायादोऽधिवासः सदा
सोऽयं **लोकगुरोर्यशोऽर्णव** इहागाधो दधानोऽमृतम् ॥

धैर्येण भूधर इवांबुधिवद् गभीरो
यस्तेजसार्क इव शीतकरः शशीव ।
ज्ञानी बृहस्पतिरिवोत्तमकर्मवीर-
स्तं भारतस्य हृदयं **तिलकं** नमामि ॥

रक्तोष्णीषं[1] शिरसि रुचिरं चन्दनाङ्कं च भाले
हस्ते यष्टिं तुहिनधवलामंगरक्षां[2] शरीरे ।
स्कंदाज्जानुस्थलविलसितं चोत्तरीयं[3] दधानं
बालं भव्यं **टिळककुलजं लोकमान्यं** नुमस्तम् ॥

गातुं तत् **तिलकस्य** वीरचरितं कर्णामृतं पावनम्
इच्छावीचि–ततिप्रकंपितजलो मन्मानसाम्भोनिधिः ।
प्रज्ञाल्पा विषयो महान् इति यथा पंगोर्गिरेर्लंघनं
प्रांशुप्राप्यफलाभिलाष इव वा खर्वस्य तद् दुर्लभम् ॥

— अणे इत्युपाव्हः श्रीधरसूनुर्माधवः ।

१ लाल पगडी. २ अंगरखा. ३ उपरणें.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भारतांतील कम्युनिस्ट व इतर मार्क्सवादी पक्ष

कम्युनिस्ट व इतर मार्क्सवादी पक्षांचें प्रजासमाजवादी पक्षापेक्षां किंवा इतर कोणत्याहि भारतीय पक्षांपेक्षां सुसंगत ध्येयवाद हें निराळें असें सर्वांत महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. सुसंगत या शब्दापेक्षां पद्धतशीर हा शब्द या ठिकाणीं अधिक चांगला लागूं पडतो. मार्क्सवाद हें या ध्येयवादाचें अधिष्ठान आहे. म्हणून या ध्येयवादास मार्क्सवादी ध्येयवाद म्हणतात. कम्युनिझम् किंवा साम्यवाद हा त्याचा निष्कर्ष आहे. मार्क्सवादी विचारसरणी व ध्येयवाद यांची एक बाजू अत्यंत ठाम असून भावनांचाहि ठाव घेणारी आहे; व दुसरी गहन असूनहि राजकीय प्रचाराला पाहिजे तें इष्ट वळण देण्यास उपयुक्त आहे. क्रांतीच्या राजकारणास उपयुक्त, स्पष्ट व ठाम अशी याची पहिली बाजू म्हणजे ऐतिहासिक भौतिकवाद होय. सामाजिक किंवा राजकीय क्रांति करणें, प्रस्थापित समाज व राज्य यांस उलथून टाकणें, त्यांत व्यत्यय उत्पन्न करणें किंवा बेबंदशाही माजवणें या गोष्टींचें बौद्धिक व नैतिक समर्थन करण्यास ऐतिहासिक भौतिकवाद मदत करतो. मार्क्सवादाची दुसरी गहन बाजू म्हणजे विरोधविकासवाद होय. तो सूक्ष्म असल्यामुळें त्याचा वाटेल तसा उपयोगहि करतां येतो. वैचारिक घोटाळयांतून उत्तीर्ण होण्याचें तें एक श्रेष्ठ साधन म्हणून मुळांत अस्तित्वांत आलें. परंतु पक्षस्थापनेनंतर शुद्ध वैचारिक भूमिका सुटण्याचा फार संभव असतो व पक्षाच्या हातांत राज्य आल्यानंतर हा संभव अधिकच वाढतो. तसें कम्युनिस्ट पक्षांच्या बाबतींत झालें आहे. म्हणून विरोधविकासवादाच्या तर्कशास्त्राचा अत्यन्त दुरुपयोग ज्ञानतः व अज्ञानतः कम्युनिस्टपक्षांनीं केला आहे. वैचारिक घोटाळा माजवून आक्षेपांतून बचावल्याची बतावणी विरोधविकासवादी तर्कशास्त्रानें चांगली करतां येते. राजकीय डावपेचांचें व संधिसाधु राजकारणाचें वाटेल तसें समर्थन करण्यास याची मदत मिळते. कम्युनिस्ट पक्षाच्या विचारांत कसलीहि भयंकर तर्कदुष्टता किंवा वैचारिक विसंगति दाखविली तरी हें ‘ Dialectics ’ आहे, म्हणून स्वतःच्या बाजूचें समर्थन करावयाचें आणि प्रतिपक्षाच्या तर्कशुद्ध विचारास हें तुमचें सर्व ‘ Mechanical ’ यांत्रिक किंवा ठोकळेबाज आहे म्हणून दोष देऊन मोकळें व्हावयाचें, याबाबतींत कम्युनिस्टांची आंतरराष्ट्रीय प्रसिद्धि आहे. पहिली जी स्पष्ट व निश्चित अशी ऐतिहासिक भौतिकवादाची बाजू आहे, त्याचासुद्धां दुरुपयोग कम्युनिस्ट कमी करीत नाहींत. आपणांस अमान्य असलेल्या विचाराचें किंवा कोटिक्रमाचें सरळ उत्तर न सांपडल्यास कधींहि बोथट न होणारीं दोन वाक्यरूपीं शस्त्रें कम्युनिस्टांच्या वैचारिक शस्त्रागारांत आहेत. त्यांतील पहिलें म्हणजे “ हें तुमचें म्हणणें भांडवलदारी विचारसरणीचें आहे. ”. व दुसरें म्हणजे “ हें तुमचें म्हणणें मध्ययुगीन कल्पनांनीं बद्ध आहे. ” प्रगतिवादावर व परिवर्तनवादावर विश्वास असलेला मनुष्य मध्ययुगीन किंवा भांडवलदारी समाजपद्धति आणि त्या प्रकारचीं मूल्यें बदलणें जरूर आहे असें मानतो. परंतु हा नवा बदल कशा प्रकारचा असावा व कसा घडवून आणावा यासंबद्दल त्याचा मतभेद कम्युनिस्टांशीं होऊं शकतो. परंतु ‘ भांडवलदारी ’ व ‘ मध्ययुगीन ’ या शेलक्या विशेषणांनीं तो बिचकतो !

स्पष्ट व पद्धतशीर विचारसरणी आणि त्यावर आधारलेला ध्येयवाद हा कम्युनिस्ट व मार्क्सवादी पक्षांचा विशेष असल्यामुळें त्यांच्यांतील कार्यकर्त्यांच्या व अनुयायांच्या ठिकाणीं आत्मविश्वास उत्पन्न होतो. या ध्येयवादामध्यें नैतिक सामर्थ्य असल्यामुळें श्रद्धा उत्पन्न होते; श्रद्धेनें व आत्मविश्वासानें सभासद धीर बनतात व सर्वप्रकारच्या अनुकूल व प्रतिकूल प्रसंगांना तोंड देण्यास सिद्ध असतात. हा ध्येयवाद केवळ पद्धतशीर व स्पष्ट आहे म्हणून त्याला इतका प्रभाव प्राप्त झाला नाहीं. त्याच्यांत आणखी एक सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे; ती म्हणजे त्यांतील आधुनिकता किंवा अद्ययावत्पणा.

मार्क्सवाद हा स्पष्ट, पद्धतशीर व आधुनिक असल्यामुळें त्याचा वर्तमानयुगांत विश्वव्यापी प्रसार झाला. त्यांत बुद्धि, भावना व इच्छाशक्ति यांच्यांत चैतन्य भरून वश करण्याची शक्ति आहे. तो केवळ बुद्धीचें समाधान करून स्वस्थ बसत नाहीं; तो आत्म्याला आकर्षित करतो. बुद्धि, भावना व इच्छा असे तीन आत्म्याचे महत्त्वाचे अंश होत. या तिन्ही अंशांचें समावेशन हा ध्येयवाद करतो. तो स्पष्ट असल्यामुळें सामान्य जन किंवा मध्यम व मंदबुद्धीचे लोक त्याला जोरदार पाठिंबा देतात; आणि त्याच्यांत आधुनिकता असल्यामुळें सुशिक्षित व वैज्ञानिक युगाशीं समरस झालेले लोक या विचारसरणीचा स्वीकार करतात. त्यामुळें त्या विचारसरणीला








नेतृत्व लाभतें. हा विचार स्पष्ट व आधुनिक असल्यामुळें तो बुद्धींत सहज शिरतो; त्यांत नैतिक ध्येयवाद असल्यामुळें गंभीर भावना व जाणीवा यांना डंवचून तो व्यथित करतो आणि चेतवितो; तो भविष्यकाळांतील अद्‌भुतरम्य ध्येयपूर्तीचा चित्रपट कल्पनेपुढें उघडून दाखवितो; क्रांति अपरिहार्यपणें ऐतिहासिक शक्तींच्या अनिवार्य वेगानें घडून येईल व मानसिक व्यथांचा परिहार होईल असें आश्वासन देऊन तो इच्छाशक्तीस प्रदीप्त करतो आणि कार्यास प्रवृत्त करतो. आधुनिक युगांत मार्क्सवादाला जो प्रभाव प्राप्त झाला त्याचें हेंच इंगित आहे. बुद्धि, श्रद्धा व इच्छाशक्ति या तिन्हींची संगति किंवा संवादिता या ध्येयवादानें राखली आहे.

परंतु प्राचीन युगांतील धार्मिक ध्येयवादाचें व मार्क्सवादाचें अनेक बाबतींत साम्य आहे. धर्मानें सृष्टीची उपपत्ति सांगून बुद्धीचें समाधान त्या काळांत केलें; नैतिक आदर्श निर्मून भावनांचें उदात्ती-करण केलें; आणि अद्‌भुत चमत्कार, स्वर्ग व मोक्ष चित्रित करून इच्छाशक्तीला कार्यप्रवृत्त केलें. मानवी ध्येयवाद कालमर्यादित व सदोष असतो म्हणून माणसास निःशंक व श्रद्धायुक्त करण्याकरितां, धर्माचा आदेश देवप्रणीत आहे असें दिव्यत्व धार्मिकांनीं त्यावर लादलें. असा दिव्यत्वाचा आरोप वगळल्यास इतर बाबतींत कम्युनिस्ट पक्षाची विचारसरणी व धार्मिक विचारसरणी यांत पुष्कळ साम्य आहे. देवाचा अवतार होऊन जगदुद्धार होतो त्याप्रमाणें कामगारक्रांति होऊन समतेचें युग अवतरतें अशी धार्मिक श्रद्धा कम्युनिस्ट पक्षाच्या सभासदाच्या ठिकाणीं उत्पन्न केली जाते. आणि असा चमत्कार घडलेला देश म्हणजे रशिया होय, असा निर्देश करून तेथील चमत्कारांची कथा रचून सांगितली जाते. हें युग दिव्यप्रामाण्याचें किंवा देवाच्या आदेशाचें नाहीं म्हणून मार्क्सवादाला त्रिकालाबाधितपणा आणण्याचा एकच मार्ग शिल्लक राहिला तो म्हणजे भावनांना विवश करणारा जबरदस्त प्रचार हा होय. शिस्तबद्ध व हुकूमशाही पद्धतीची पक्षरचना व राज्यरचना करून या प्रचाराला भावनेचें दृढ अधिष्ठान मिळविण्याचा प्रयत्न कम्युनिस्ट करतात. परंतु मानवी बुद्धीचेंहि समाधान करावेंच लागतें. मार्क्सवाद हा विज्ञानपूजक आहे. त्यामुळें बुद्धीचें समाधान करणारी विचारसरणी त्यानें निर्मिली आहे.

मार्क्स व एंगेल्स यांनीं आपल्या समाजवादांत व पूर्वींच्या समाजवादांत महत्त्वाचा फरक 'वैज्ञानिक' या शब्दानें दाखविला आहे. पूर्वींचा समाजवाद अद्‌भुत ध्येयाचा पूजक आहे व आमचा समाजवाद वैज्ञानिक आहे, असें त्यांनीं म्हटलें आहे. या मताचा अर्थ असा कीं, मार्क्सवादाच्या बाहेरचे समाजवादी हे स्वप्नमय ध्येयसृष्टीचा तरी पाठलाग करीत आहेत किंवा विज्ञानदृष्टि नसल्यामुळें शुद्ध क्रांतिमार्ग सांपडला नाहीं, म्हणून परिस्थितीला शरण गेले आहेत; केवळ मार्क्सवादच वैज्ञानिक सत्याची कास धरून भावी ध्येयमय सत्यसृष्टीकडे प्रवास करीत आहे. विज्ञानाचा मूळ सिद्धान्त असा कीं सामाजिक किंवा विश्वाची वस्तुस्थिति अशी आहे कीं, तिच्या स्वभावधर्मानुरूप सतत बदल होत असतो, घडामोडी किंवा परिवर्तन होत असतें; हाच वस्तुस्वभाव होय. वस्तुस्वभावाच्या नियमांचें ज्ञान म्हणजे विज्ञान होय. सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रिया ( Social Processes ) ज्या नियमांनीं चालतात त्या नियमांवर आधारलेला ध्येयवाद म्हणजे मार्क्सचा समाजवाद होय, असा मार्क्स् व एंगेल्स् यांचा दावा आहे. यावरून जें निगमन निघतें तिकडे कोणत्याच कम्युनिस्टाचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. तें निगमन असें कीं, सामाजिक कार्यकारणभावाच्या नियमांनीं कम्युनिझम किंवा समाजवाद ही घटना अपरिहार्यपणें घडून येते. ही गोष्ट, समाजवाद अमान्य असणाऱ्या माणसासहि मार्क्सवादाचें अध्ययन केल्याबरोबर पटली पाहिजे. ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केलेल्या माणसास ग्रहांचीं परिभ्रमणें, चंद्रसूर्यांचीं ग्रहणें किंवा समुद्राची भरती-ओहटी अमुक एका पद्धतीनें अमक्या वेळीं घडून येणारच हें, ह्या गोष्टी अनिष्ट वाटल्या तरी, पटतेंच. जालीम विषापासून येणारें मरण द्वेष्य वाटलें तरी मान्यच करावें लागतें. याप्रमाणेंच समाजवादाची अपरिहार्यता आणि कम्युनिझमची अनिवार्यता पटविणारें क्रांतीचें गणित मार्क्स, एंगेल्स, लेनिन वा स्टालिन यांनीं कोठें मांडलें आहे काय ? तसें मांडलें नाहीं व तसें मांडतां येणेंहि अजून शक्य नाहीं. ज्या वस्तूच्या नियमानुसारानें क्रांति घडते ती वस्तु समाज होय; किंवा आर्थिक, राजकीय इत्यादि प्रकारची मानवी संघटना होय. या वस्तूसंबंधींचीं किंवा या संघटने –








संबंधींचीं विज्ञानें मार्क्सनंतर शंभर वर्षे लोटलीं तरी पदार्थविज्ञान, रसायन, ज्योतिष इत्यादि विज्ञानांच्या पातळीपर्यंत म्हणजे प्रगल्भावस्थेस पोचलेलीं नाहींत. सामाजिक कार्यकारणभाव ओळखून सामाजिक भविष्य वर्तविण्याइतकें सूक्ष्म व तपशीलवार नियमांचें विज्ञान अजून जन्मावयाचें आहे. सामाजिक शास्त्रें अजून बऱ्याच प्रमाणांत विवरणात्मक (descriptive) अवस्थेंत आहेत. कांहीं गृहीत कृत्यांच्या मर्यादेमध्येंच थोडीशीं भविष्यें ( Predictions ) " जर तर " च्या भाषेंत सांगतां येतात. मार्क्स हा विज्ञानपद्धतींत अत्यंत निपुण होता, परंतु त्यानें जीं भविष्यें वर्तविलीं आहेत तीं पुऱ्या पुराव्यावर आधारलेलीं नाहींत.

मार्क्सचीं अनेक भविष्यें गेल्या शंभर वर्षांच्या अनुभवानें ना-शाबित झालीं आहेत. भांडवलशाहीच्या संपूर्ण विकासानंतर समाजवादी क्रांति होऊं शकते, हें त्याचें भविष्य खोटें नाहीं कां ठरलें ? ज्या देशांत भांडवलदारी मागासलेली होती त्या रशिया-चीन सारख्या देशांत समाजवादी क्रांति झाली. अर्थात् रशियांतील क्रांति समाजवादी क्रांति होय, हें मान्य केलें तरच हें विधान बरोबर ठरेल. मार्क्सचें दुसरें एक भविष्य असें कीं, भांडवलशाहीच्या वाढीबरोबर थोड्याच वर्गांच्या हातीं संपत्ति सांठते व समाजाच्या मोठ्या भागांत दारिद्र्य, विपत्ति व अधःपात वाढत जातात. हेंहि भविष्य अमेरिका व पश्चिम युरोपांतील देश यांना गेल्या शंभर वर्षांत केव्हांच लागूं पडलें नाहीं. मार्क्सचें तिसरें एक भविष्य असें कीं, भांडवलदारी समाजांत भांडवलदार व कामगार असे दोनच वर्ग प्राधान्य पावतात व कामगारवर्ग स्वतःच क्रांतीचें पुढारीपण करून क्रांति घडवून आणतो. परंतु भांडवलदारीच्या वाढीबरोबर शिक्षित व तंत्रविशारद मध्यमवर्गहि प्रभावी बनतो आणि महत्त्वास चढून समाजाच्या सर्वच क्षेत्रांत नेतृत्व करूं लागतो. राज्यसंस्था प्राधान्यानें त्याच्याच हातांत खेळत असते. बाकीचे वर्ग आपापल्या आर्थिक व्यवहारांत निमग्न असतात.

सर्व प्रश्नांचीं उत्तरें मार्क्सवादांत सांपडतात, अशा भ्रमांत कम्युनिस्ट सांपडलेले असतात. प्राचीन काळांतील सुप्रसिद्ध जलप्रलयाच्या वेळीं जगाला नोहाच्या नौकेनेंच तारलें, तसें आजच्या मानवसमाजाला मार्क्सवाद हाच तरणोपाय आहे, अशी कम्युनिस्टांची श्रद्धा आहे. या श्रद्धेंतून नशा उत्पन्न होतो किंवा वेडहि लागतें. परंतु मार्क्सवाद हा विज्ञानपूजक असल्यामुळें कम्युनिस्टांना विज्ञानाची चाड बाळगावी लागते. अधिक वैज्ञानिक संशोधनाचे निर्णय हाच नशा किंवा वेड उतरविण्याचा उपाय होऊं शकतो. निदान मार्क्सवादी पक्षांत नवी भरती होण्याचें प्रमाण त्यामुळें कमी होण्याचा संभव आहे.

ध्येयवाद वैज्ञानिक असावयास पाहिजे, हें मार्क्सचें म्हणणें मात्र जीवनांतलें सर्वश्रेष्ठ सत्य आहे. याचा अर्थ असा कीं सामाजिक वस्तुस्थितीशीं किंवा वस्तुस्थितीच्या नियमाशीं ज्यांचा मेळ बसतो अशींच ध्येयें माणसांनीं बाळगलीं पाहिजेत. ध्येयें हीं संभवनीय म्हणजे वस्तुस्थितीशीं जमणारीं किंवा शक्य कोटींतलीं असावीं लागतात. संभव म्हणजे अपरिहार्यता मात्र नव्हे. दुसरा अर्थ असा कीं, क्रांतीचें स्वरूप अमलांत आणण्यासारखें किंवा व्यवहार्य असावें लागतें व क्रांतीकडे नेणारा व्यवहार्य कार्यक्रम दाखवितां येणें आवश्यक असतें.

कम्युनिस्ट हे विज्ञानपूजक असले तरी त्यांची मनःप्रवृत्ति वैज्ञानिक दृष्टिकोणाला बाध आणणारी असते. मानवी विचार चुकूं शकतात; परिस्थितीला एकाच मार्गानें व एकाच प्रकारचें वळण मिळूं शकतें असें नव्हे. भविष्यकाळांत सद्बेतूनें घडवून आणलेल्या घटनांच्या मूल्यांत तारतम्य असूं शकतें; म्हणून मनुष्याला निवडीचें स्वातंत्र्य आहे, हा वैज्ञानिक दृष्टिकोण मार्क्सवादाच्या संबंधांत कम्युनिस्ट वापरूं शकत नाहीं. लोककल्याणकारक समाजरचना एकाच प्रकारची असूं शकते, असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून मनुष्याला निवडीचें स्वातंत्र्य असलें पाहिजे व विविध सामाजिक प्रयोग करण्याचें स्वातंत्र्य त्या त्या समाजाला व त्या त्या राष्ट्राला असलें पाहिजे. सामाजिक न्याय, स्वातंत्र्य व समता अमुकच एका प्रकारच्या समाजरचनेंत पूर्णतेस जातील अशीं निश्चित एकमार्गी गमकें सांगणारें विज्ञान अजून निर्माण झालें नाहीं. परंतु अशा प्रकारचे विचार जगांतील कोणत्याच कम्युनिस्ट पक्षाला मानवलेले दिसत नाहींत. याचा असा अर्थ होतो कीं, विज्ञानपूजक असलेला कम्युनिस्ट पक्ष वैज्ञानिक दृष्टिकोणास पारखा झालेला आहे.







विचारसरणी व ध्येयवाद या दृष्टीनें मार्क्सवादाचें मूल्यमापन केल्यानंतर आतां कम्युनिस्ट किंवा मार्क्सवादी पक्षांचा ऐतिहासिक परामर्श घेऊन त्यांचे कार्यक्रम व धोरण यासंबंधीं विचार करूं. मार्क्सवादी व कम्युनिस्ट पक्षांना युरोपांत अस्तित्वांत येऊन १०० वर्षें झालीं. इंग्लंड वगळल्यास जगांतील इतर ठिकाणच्या कामगार-चळवळींवर व समाजवादी संघटनांवर मार्क्सवादाइतका प्रभाव इतर कोणत्याच विचारसरणीनें टाकला नाहीं. एकोणिसाव्या शतकांत जर्मन समाजवादी पक्षांत मार्क्सवाद मान्य झाला; आणि विसाव्या शतकांत फ्रान्स इत्यादि देशांतील समाजवादी चळवळींत मार्क्सवादास प्रधानपद प्राप्त झालें. आशिया-खंडांत विशेषतः हिंदुस्थान, चीन इत्यादि देशांत मार्क्सवादाचें आगमन रशियन राज्यक्रांतीनंतर झालें. रशियन राज्यक्रांति झाल्यानंतर समाजवादावरील अव्यवहार्यतेचा शिक्का पूर्ण पुसला गेला. त्यामुळें चालू सामाजिक व राजकीय परिस्थितीबद्दल असंतुष्ट असलेल्या मनांना आश्वासन मिळून नव्या ध्येयवादाची प्रेरणा मिळाली. हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्यशाहीबद्दलच्या असंतोषाला मार्क्सवादी विचारसरणीनें अधिक तिखट धार आणली. परंतु येथील कामगार-चळवळींत सामील असलेल्या कांहीं सुशिक्षितांनांच मार्क्सवादाचें महत्त्व अधिक पटलें. त्याच्या योगानें आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचें येथें बीजारोपण झालें; आणि मुंबई, कलकत्ता, कानपूर यांसारख्या शहरांतील कामगार-विभागांत कम्युनिस्ट पक्षानें आपला लाल झेंडा रोंवला.

कम्युनिस्टपक्षाची विचारसरणी स्पष्ट व पद्धतशीर असल्यामुळें आणि रशियन राज्यक्रांतीच्या प्रभावामुळें, पक्षसंघटनेचा लहानसा पाया व्यवस्थित रीतीनें भारतांतहि घातला गेला. कम्युनिस्ट पक्षसंघटनेचें तंत्र अत्यंत बळकट असतें. हा विशेषतः कार्यकर्त्यांचाच पक्ष असतो. कार्यकर्त्याला पक्षांत महत्त्वाचें स्थान मिळविण्यास दीर्घकाल उमेदवारी करावी लागते. पक्षांत शिस्तीला फारच महत्त्व असतें. त्यामुळें व्यक्तीला आपलें स्वातंत्र्यहि गमवावें लागून पक्षास संपूर्ण शरण जावें लागतें. याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं लायक कार्यकर्त्यांना आपल्या योग्यतेप्रमाणेंच पक्षांत स्थान मिळतें. पक्षांत मागाहून आलेलीं अधिक योग्य माणसें कायम मागेंच पडण्याचा फार संभव असतो. एकदां 'दादा' झालेले आपली 'दादा'गिरी कायम चालवूं लागतात. त्यामुळें पत्त्यांतील डावाप्रमाणें ठराविक माणसेंच मागेंपुढें होत असतात. हा दोष भारतीय कम्युनिस्ट पक्षांत अधिक प्रकोप पावला आहे. परंतु आपणांस येथें या अंतर्गत भानगडींशीं कांहीं कर्तव्य नाहीं. या पक्षाच्या भारतांतील भवितव्याच्या दृष्टीनेंच त्याची मीमांसा येथें कर्तव्य आहे.

भारतास स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंत तात्पुरत्या मागण्यांच्या पूर्तीकरितां उठाव करणें आणि कम्युनिझमूचा वैचारिक प्रचार करणें एवढेंच काम या पक्षानें केलें. भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळींत या पक्षानें मनापासून प्रत्यक्ष भाग कधींच घेतला नाहीं. त्या बाबतींत त्या पक्षाची नेहमींच द्विधा मनःस्थिति व धरसोडीची वृत्ति राहिली. हिंदी कॉंग्रेस ही भांडवलशाहीच्या प्रतिनिधींच्या नेतृत्वाखालीं चालते, असें कॉंग्रेसबद्दलचें त्याचें निदान होतें. परंतु आपणांस येथें स्वातंत्र्यपूर्वकालांतील वादविवादाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. हिंदुस्थानांत कम्युनिस्टपक्षाला कामगारवर्गांत जरी महत्त्वाचें स्थान प्रसंगविशेषीं प्राप्त झालें तरी खरेखुरें सामाजिक अधिष्ठान म्हणून कामगारवर्ग त्या पक्षाच्या पाठीशीं कायमचा म्हणून कधींच उभा राहिला नाहीं.

कामगारांच्या कांहीं संघटना कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालीं दीर्घ काल राहिल्या; परंतु कम्युनिस्ट पक्षाचें सामर्थ्य वाढविण्याच्या दृष्टीनें त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं. कामगारसंघटना व कम्युनिस्टसंघटना जशा जगांत इतरत्र कोठेंच एकरूप झाल्या नाहींत तशा भारतांतहि झाल्या नाहींत. कम्युनिस्ट किंवा समाजवादी ध्येयवादाचा प्रचार करण्याचें एक सर्वांत महत्त्वाचें क्षेत्र म्हणून कम्युनिस्टांनीं येथें कामगारसंघटनांचा उपयोग केला. परंतु त्या बाबतींतहि त्यांना अत्यंत अल्प यश आलें. या बाबतींत कांहीं मार्क्सवाद्याचें असें म्हणणें होतें कीं, भारत कारखानदारीच्या दृष्टीनें मागासलेला देश आहे; येथें खरीखुरी औद्योगिक क्रांति झालेली नाहीं; म्हणून खराखुरा क्रांतिकारक बलिष्ठ कामगारवर्ग येथें अस्तित्वांत आलाच नाहीं. येथें कामगारवर्ग लोकसंख्येच्या मानानें अत्यंत अल्प आहे. येथें औद्योगिक क्रांति निर्माण झाल्यावर जो प्रचंड कामगारवर्ग अस्तित्वांत येईल तोच कम्युनिस्ट क्रांतीचा








अग्रेसर होईल.

परंतु कामगारवर्गाच्या बाबतींत समाजवादी व मार्क्सवादी यांनीं क्रांतीच्या दृष्टीनें केलेलें मूल्यमापन सबळ पुराव्यावर आधारलेलें आहे असें दिसत नाहीं. या मुद्द्यावर मार्क्सची वर्गयुद्धाची मीमांसाच आक्षेपार्ह ठरते. कामगारचळवळ ही क्रांतिकारक स्वरूपाची असते, याचें निश्चित उदाहरण कोठेंच मिळत नाहीं. पाश्चात्त्य देशांतील कामगारचळवळींचा इतिहास असें सांगतो कीं, त्या चळवळींचें मुख्य उद्दिष्ट क्रांति हें नसून कामगारांची आर्थिक व सांस्कृतिक सुस्थिति हेंच आहे, भांडवलदारवर्ग नष्ट करण्याकरितां नव्हे तर स्वतःची सुस्थिति प्राप्त करून घेण्याकरितां कामगारवर्गाचे झगडे चालू असतात. तात्पर्य, कामगारवर्ग हा समाजवादी क्रांतीचा नेता होय, हें प्रचारसूत्र म्हणून जरी उत्तम असलें तरी त्यांत सत्य थोडें आहे. दुसरें असें कीं, कामगारवर्गाला स्वदेश नाहीं असें मार्क्स व मार्क्सवादी म्हणतात. परंतु त्या त्या राष्ट्रांवर संकट आलें असतां कामगारवर्ग नियमानें स्वराष्ट्रसंरक्षणाच्या आघाडीवर लढला आहे; क्रांतिकारकांचा यादवी युद्ध पुकारण्याचा आदेश त्या वेळीं त्यांनीं साफ झिडकारला आहे. भारतांतील कामगारवर्ग हाहि राष्ट्रीयच आहे. समाजवादी क्रांतींत तो सामील होण्यास इतरांबरोबरच तयार होईल. परंतु इतर वर्ग समाजवादी क्रांतीस विरोध करतील व कामगारवर्गच क्रांतीचा नेता बनेल असें म्हणण्यास कांहींहि सबळ प्रमाण नाहीं.

भारतांत शांततेनें सत्तांतर झाल्यानंतर कम्युनिस्ट पक्षाला वाटलें कीं प्रतिक्रांति झाली आहे आणि हें सत्तान्तर अस्थिर किंवा डळमळीत आहे. येथें खरें स्वराज्य आलेंच नाहीं, ब्रिटिशसाम्राज्यशाहीचेंच हस्तक कॉंग्रेससरकार आहे असें समजून त्यांनीं तेलंगणांत विध्वंसक चळवळीस सुरवात केली व नेहरू–सरकारला रशियांतील १९१७ सालांतील तात्पुरत्या औटघटकेच्या केरेन्स्की सरकारची उपमा देऊन देशव्यापी उठावाचा कार्यक्रम आंखण्याचा प्रारंभ केला. या बाबतींत कम्युनिस्ट पक्षाचें सगळेंच फसलें. ते स्वतःस फसवीत असल्यामुळें यापुढेंहि त्यांची फसवणूक अशीच चालू राहील. अनिष्ट मार्गानें कांहीं अनपेक्षित वा आकस्मिक परिस्थिति प्राप्त झालीच तर कम्युनिस्टाला विशेष आशा आहे. वर्तमानस्थितीवरून असें म्हणणें भाग आहे कीं, या पक्षाला भारतांत चांगलें भवितव्य येणें कठिण आहे. याचीं अनेक कारणें आहेत आणि तीं मूलगामी आहेत.

पहिलें महत्त्वाचें कारण असें कीं, त्यांची येथील सत्ताधारी पक्षाबद्दलची व राज्याच्या सामाजिक स्वरूपाबद्दलची मीमांसा एका चुकीच्या दृष्टिकोणावर आधारलेली आहे. हा दृष्टिकोण म्हणजे मार्क्सचें व लेनिनचें राज्यशास्त्र होय. या राज्यशास्त्राप्रमाणें कोणतेंहि राज्य हें विशिष्ट एका वर्गाच्याच प्रतिनिधींचें राज्य असतें आणि त्या वरिष्ठ वर्गाचेच हितसंबंध सुरक्षित ठेवण्याकरितां सत्ताधारी पक्ष वा राज्यसंस्था राज्याचे नियम रचून सत्तेची अंमलबजावणी करतें. राज्य म्हणजे विशिष्ट वर्गाची सतत तरफदारी करणारी हुकमत होय. अशा या मार्क्सच्या व लेनिनच्या राज्यशास्त्राप्रमाणें कम्युनिस्टपक्ष कॉंग्रेसपक्षाच्या द्वारें चालविलेल्या हिंदी संघराज्याची मीमांसा करून, हें राज्य भांडवलशाही राज्य आहे, असें ठरवतो; आणखी असें म्हणतो कीं हें राज्य साम्राज्यशाहीचे अवशेष असलेल्या हितसंबंधांचें भारतांत रक्षण करतें. सामान्य जनतेच्या दडपणामुळें कांहीं सुधारणा राज्यांत जरी घडत आहेत, तरी त्या नाखुशीनें घडत आहेत, असाहि तो आरोप करतो. तात्पर्य, भारतीय संघराज्य हें लोकशाहीच्या बुरख्याखालीं वरिष्ठवर्गीय हितसंबंधाचें रक्षण करणारें राज्य आहे; म्हणून हें राज्य नष्ट करण्याची संधि शक्य तितक्या जवळ आणली पाहिजे व त्या संधीच्या प्रतीक्षेंत काळ घालविला पाहिजे असा कम्युनिस्ट पक्षाचा संकेत आहे.

अशी ही वर्गलक्षणेच्या आश्रयानें कम्युनिस्टांनीं केलेली राज्यमीमांसा कॉंग्रेस–पक्षाच्या अधिवेशनांतील अलीकडे झालेल्या ठरावांशीं जुळत नाहीं. कॉंग्रेसनें वर्गहीन समाजरचना हें संघराज्याचें ध्येय एका अधिवेशनांत उद्घोषित केलें; आणि नंतर आवडीच्या अधिवेशनांत समाजाची समाजवादानुसार मांडणी, हें धोरण जाहीर करून वर्गहीन समाजरचनेच्या तत्त्वाला दुजोरा दिला. या ठरावांच्या अनुसारानें प्रगति करण्याकरितां आर्थिक व शैक्षणिक नियोजनांची व लोकहितकारी कार्यक्रमांची आखणी संघराज्य व प्रादेशिक राज्यें करीत आहेत; तदनुसारच मध्ययुगीन अवस्थेची दर्शक असलेली जमीनदारी व जहागिरदारीसंस्था क्रमानें






नष्ट करणारीं विधेयकें क्रमानें पुढें येत आहेत. अनेक महत्त्वाचे उद्योगधंदे व कारखाने यांचेंहि राष्ट्रीयीकरण सावकाशपणें करण्याचें धोरण अमलांत येत आहे.

समाजवादी क्रांतीकडे सत्ताधारी पक्षाचें धोरण अशा रीतीनें निश्चितपणें झुकत असलें तरी कम्युनिस्ट व मार्क्सवादी पक्षांचा त्यावर विश्वास बसत नाहीं. याचें कारण मार्क्सवादांतील राज्यमीमांसा हें होय. राज्यसत्ता धारण करणारा गट म्हणजे भांडवलशाही वर्गाचा गट होय, हें या राज्यमीमांसेचें समीकरणच अशा अविश्वासास कारण आहे. या समीकरणास राष्ट्रांच्या राजकीय इतिहासांत कांहीं आधार सांपडत असले तरी ते आधार पुरेसे नाहींत. राज्यांचा उत्कर्ष होत असतां ऐतिहासिक विकासक्रमांत सामाजिक स्वास्थ्य वृद्धिंगत ज्यांत होतें असा कालखंड येतच असतो. या प्रत्येक कालखंडांत समाजाच्या सर्वसामान्य हिताची साधना करणें, हा राज्यसत्तेचा हेतु उघडकीस येतो; किंवा तेंच राज्याचें सुलक्षण होय, ही गोष्ट बरींच राज्यशास्त्रें मानतात. समाजधारणाशास्त्र म्हणजेच राज्यशास्त्र अशी व्याख्याहि त्यांत सांगितलेली असते.

दुसरें असें कीं सत्ताधारी गट व संपत्तिस्वाम्य धारण करणारे वर्ग एक नसतात. सत्ताधारी वर्ग व बडा संपत्तिधारी वर्ग यांचे पृथक् गट असतात हें गेल्या शंभर वर्षांचा इतिहास पाहिला तरी दिसून येतें. सत्ताधारी गट आपली सत्ता स्थिर, प्रभावी व टिकाऊ करण्यांत गढलेला असतो. लोकहितकारी किंवा समाजांतील जागृत लोकशक्तीस संतुष्ट ठेवणारा कार्यक्रम अमलांत आणण्यांतच सत्तेस बळकटी येते, ही गोष्ट सत्ताधारी गटास पूर्णपणें माहीत असते. म्हणून कार्यक्षम व विचक्षण सत्ताधारी गटाला हा उद्देश सफल करण्याचेंहि सामर्थ्य असते. संपत्तिधारी किंवा भांडवलदार वर्गास त्याच्यापुढें नेहमी नमावेंच लागतें. विशेषतः आधुनिक यांत्रिक युगांत तर राज्ययंत्र हें अधिक स्वतंत्र आणि समाजांतील कोणत्याहि वर्गापेक्षां बलिष्ठ झालें आहे. राज्यधारी गटाचें सामर्थ्य आधुनिक तंत्रांनीं व यंत्रांनीं सज्ज अशा देशव्यापी दळणवळणाच्या साधनांनीं आणि खड्या लष्कराच्या योगानें समाजांतील कोणत्याहि शक्तीपेक्षां अनंत पटींनीं जबरदस्त बनलें आहे. म्हणून कोणत्याहि विशिष्ट वर्गाची मिनतवारी करण्याची त्याला मुळींच आवश्यकता राहिली नाहीं. याबरोबरच आणखी एक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. ती ही कीं, लहानमोठ्या क्रांतिकारक राज्यविरोधी संघटनांच्या योगानें शांततेच्या काळांतील कोणतेंहि आधुनिक राज्य उलथून पाडण्याची शक्यताहि आतां राहिली नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, आधुनिक राज्यें समाजहिताला नेहमींच जबाबदार राहतात. परंतु, समाजहिताला जबाबदार राहूनच आपली सत्ता अधिक व्यापक करणें हें धोरण निर्वेधपणें साधणें आतां फारच शक्य झालें आहे. भांडवलशाही अर्थशास्त्राच्या मर्यादेचें बंधन समाजहिताला पोषक नसेल, तर तें तोडण्यांत कसलीहि दिक्कत राज्यानें बाळगण्याचें आतां कारण नाहीं. आर्थिक विकासाला भांडवलशाही बंधन घालते हें दिसल्याबरोबर तें बंधन तोडण्यास कोणतेंहि आधुनिक राज्य मागेपुढें पाहाणार नाहीं, हें उघड दिसत आहे. म्हणून समाजहिताकरितां भारताचें संघराज्य समाजवादी रचनेचा स्वीकार करण्यास तयार झालें आहे, ही गोष्ट सत्ताधारी गट व संपत्तिशाली वर्ग यांच्याबद्दलच्या वरील मीमांसेवरून उपपन्न होते.

भारताच्या संघराज्यानें कम्युनिस्ट, समाजवादी किंवा मार्क्सवादी पक्षांचा ध्येयवाद बऱ्याच अंशानें मान्य केलेला आहे. त्यामुळें या राज्याविरुद्ध क्रांतिकारक उठाव करण्याचें या पक्षाचें राजकारण निस्तेज बनत चाललें आहे; विशेषतः वर्गविग्रहाच्या धोरणाची धार बोथट होत चालली आहे. त्यामुळें आतां सत्तारूढपक्षाच्या व राज्याच्या कार्यक्रमांतील तपशिलाचे दोष काढण्यांत विरोधी पक्षांची मति गुंतून जाऊं लागली आहे. एका अर्थानें वैचारिक सामर्थ्यास घट लागली आहे आणि छिद्रान्वेषीपणा वाढून पराभूत मनोवृत्तीचें पोषण होऊं लागलें आहे. विचारांचा ताजेपणा निघून गेला आहे.

मार्क्सवादी पक्षांचें भवितव्य संपल्याचें दुसरें कारण त्यांनीं क्रांतीच्या नैतिक बाजूचें खरें आकलन केलें नाहीं, हें होय. विशिष्ट कालखंडांतील परिस्थितींत सर्वच समाजास क्रांतीची गरज असते व भासते आणि ही क्रांति पोटाच्या भुकेपेक्षां आत्म्याच्या भुकेनेंच प्रेरित झालेली असते. सामाजिक दुरवस्थेची किंवा अधःपाताची जाणीव म्हणजे नैतिक जाणीवेचीच एक अवस्था होय. मानव्याच्या उत्कर्षाचीं मूल्यें ज्यांच्या हृदयांत रुजलेलीं








असतात त्यांच्याच मनाला सामाजिक अवनतीच्या वेदनांची खरीखुरी जाणीव होत असते. कम्युनिस्ट किंवा मार्क्सवादी पक्ष यापुढें अधिक निस्तेज होत जातील याचें एक मुख्य कारण क्रांति ही मुख्य नैतिक गरज आहे हें तत्त्व त्यांना मान्य नाहीं हें होय.

याचें अधिक स्पष्टीकरण केलें पाहिजे; भांडवलशाही समाजरचनेच्या काळांत लोकशाहीचा व तिच्या नैतिक तत्त्वज्ञानाचा उदय झाला. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव हीं लोकशाहीचीं नैतिक मूल्यें होत. हे जसे मानवी मूलभूत हक्क आहेत, तशींच हीं मूलभूत मानवी कर्तव्येंहि आहेत. या मूल्यांची योग्य दखल घेऊन व त्यांचा शाश्वत महिमा ओळखून क्रांतीची साध्यसाधनमीमांसा कार्ल मार्क्सनें व लेनिननें केली असती तर वर्गविग्रहाच्या मीमांसेबरोबरच मानव्याचीहि मीमांसा क्रांतीच्या तत्त्वज्ञानास उपयोगी पडली असती. क्रांतीमध्यें पीडित वर्गच नव्हे तर सर्व मानवसमाज भाग घेण्यास पुढें येऊं शकतात ही गोष्ट त्यांच्या लक्षांत नीटपणें आली असती. परंतु मार्क्सवादानें नीति ही सापेक्ष ठरविली, त्यामुळें ती तशी लक्षांत आली नाहीं. वस्तुतः दलितवर्गहि पोटाच्या भुकेमुळें नव्हे तर नैतिक भावना प्रक्षुब्ध होऊनच क्रांतींत सामील होतात. परंतु याचा स्पष्ट प्रत्यय मार्क्सला आला नाहीं. नीति केवळ सापेक्ष नसते, ती विकास पावत असते. भांडवलशाही समाजव्यवस्थेंतील विज्ञान, यंत्र व तंत्र यांचा जसा क्रांतीनें स्वीकार करावयाचा असतो, त्याचप्रमाणें भांडवलशाही समाजस्थितींत विकास पावलेल्या नैतिक भावनांचेंहि आवाहन मान्य करावें लागतें. वर्गयुद्धविषयक एकांगी कल्पनेच्या आहारीं जाऊन कम्युनिस्टांनीं सर्वव्यापी मानव्याचा अव्हेर केला. या मानव्याची अथवा नैतिक मूल्यांची परंपरा अधिक जागृत करून तिचा महिमा स्थापित करण्याचें काम हें भारतांतील राजकीय चळवळीचें महत्त्वाचें अंग समजलें गेलें आहे. कम्युनिस्टांची व्यापक मानवी मूल्यांवर अथवा लोकशाही मूल्यांवर श्रद्धा नाहीं. त्यामुळें त्यांचा पक्ष भारतीय राजकारणांत यापुढें प्रभावी ठरणार नाहीं. या बाबतींत त्यांचा साध्यसाधनविचार सपशेल चुकलेला आहे. लोकशाहीच्या द्वारेंच किंवा लोकशाहीचा महिमा वृद्धिंगत करूनच क्रांति घडवून आणावयाची या सिद्धांतावर त्यांचा विश्वास नाहीं. म्हणून त्यांना नेहमीं डावपेचाचेंच राजकारण खेळावें लागणार. डावपेंचाच्या राजकारणांत त्यांचा पाय अधिकच खोलांत जाईल.

कम्युनिस्ट पक्षाचें भवितव्य संदेहांत पडण्याचें आणखी एक कारण म्हणजे त्यांचें सोव्हिएट रशियाशीं असलेलें निगडित व पवित्र नातें होय. सोव्हिएट रशियांतील राज्यव्यवस्था हा त्यांच्या पुढचा प्रत्यक्ष व मूर्तिमंत आदर्श आहे. सोव्हिएट रशियांतील हुकूमशाही राजवट त्यांना मान्य आहे. याचा अर्थ असा होतो कीं, लोकशाही मूल्यांची पायमल्ली करण्यास हिंदी कम्युनिस्ट प्रसंगीं मागेंपुढें पाहणार नाहींत. एवढेंच नव्हे, तर कम्युनिस्टांच्याबद्दल आणखी एक जबरदस्त शंका याच कारणास्तव उत्पन्न होते. हिंदी कम्युनिस्ट पक्ष किंवा कॉमिन्फॉर्मशीं संलग्न असलेले इतर राष्ट्रांतील कोणतेहि कम्युनिस्ट पक्ष हे सोव्हिएट रशियाच्या परराष्ट्रीय राजकारणाचें हत्यार बनले आहेत, असा वहीम येणें अगदीं स्वाभाविक आहे. म्हणजे स्वदेशाशीं ते बेइमानी करतील अशी धास्ती उत्पन्न होणें रास्त ठरतें. या पक्षाच्या भवितव्याबद्दल साशंक होण्याचें हें महत्त्वाचें एक कारण आहे, हें व्यवहारी राजकारण जाणणाऱ्याला पटण्याची शक्यता खूप आहे.

सध्यां पं. नेहरूंचा रशियांतील दौरा संपल्यानंतरच्या या कालखंडांत भारतीय किंवा अन्यदेशीय कम्युनिस्ट पक्षांच्या कार्यक्रमांत, धोरणांत व तत्त्वज्ञानांतहि बदल घडून येण्याचा संभव उत्पन्न झाला आहे. हा बदल पं. नेहरूंच्यामुळेंच होण्याची शक्यता आहे असें नव्हे. अत्यंत महत्त्वाचें कारण म्हणजे अणुशक्तीचें युग होय. जागतिक युद्ध पेटलें तर यापुढें अणुशक्तीच्या अस्त्रांनीं मानवी विश्वाचा प्रलय होण्याचा धोका उत्पन्न झाला आहे. अणुशक्तीस भांडवलदारी जग व समाजवादी जग हा भेदभाव समजत नाहीं. म्हणून युद्धसंस्थाच कायमची नष्ट करणें माणसाचें श्रेष्ठ कर्तव्य झालें आहे. अणुयुगानें माणसाच्या ध्येयवादांत मौलिक बदल करण्याची गरज उत्पन्न केली आहे. सर्व लहानमोठे प्रश्न अहिंसेनें किंवा शांततेच्या मार्गानेंच सोडविले पाहिजेत असा साध्यसाधनविवेक मानवी विचारांचा पाया बनण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. सोव्हिएट राज्याच्या नेत्यांना ही गोष्ट










मान्य झाली आहे याचें प्रत्यंतर त्यांच्या नव्या धोरणांत मिळूं लागलें आहे. परराष्ट्रमंत्री मोलोटॉव्ह यांनीं नुकतेंच जें वक्तव्य केलें त्यांत यास दुजोरा मिळतो. विश्वव्यापी शांतता संघटित करणें ( consolidation of universal peace ) हें नजीकचें उद्दिष्ट त्यांनीं घोषित केलें आहे.

हें नजीकचें अत्यंत महत्त्वाचें धोरण म्हणून जर रशियन नेत्यांनीं प्रामाणिकपणें मान्य केलें असेल तर त्यापासून अनेक महत्त्वाच्या जबाबदाऱ्या कम्युनिस्ट विचारसरणीच्या सर्व संप्रदायांवर येऊन पडतात. विश्वव्यापी शांतता ही कम्युनिस्टांनीं जर अंतिम निष्ठा मानली तर त्यांचें सर्व राजकीय धोरण आणि त्यांचें तत्त्वज्ञान म्हणजे मार्क्सवाद यांत मौलिक परिवर्तन करावें लागेल. राजकीय धोरणांत बदल करावयाचा म्हणजे यांत तीन मुद्द्यांचा समावेश होतो. एक, जगांतील कम्युनिस्ट पक्षाचें विसर्जन करणें किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे कामिन्फॉर्मला तिलांजलि देणें, हा होय. कारण बिन-कम्युनिस्ट राष्ट्रांच्यामध्यें असलेले कम्युनिस्टपक्ष हे तेथील राज्यें केव्हां तरी नष्ट करावीं म्हणून अस्तित्वांत आलेले आहेत. त्यांच्याबद्दल त्या त्या राष्ट्रांत साशंकता असल्यामुळें शांततेच्या सुरक्षिततेबद्दल शंका राहते. दुसरा मुद्दा असा कीं, रशिया, चीन, इत्यादि राज्यांची हुकूमशाही पद्धति बदलून त्यांत विचारप्रदर्शनाचें आणि संघटनेचें स्वातंत्र्य वापरण्याचे हक्क नागरिकास प्राप्त व्हावयास पाहिजेत. हुकूमशाही राज्यहि लष्करी हुकूमत असते. तें केव्हां आक्रमक बनेल, याचा नियम नसतो. याहिपेक्षां अधिक महत्त्वाचा बदल म्हणजे मार्क्सवादी तत्त्वज्ञानांतला बदल होय.

सहजीवनाचा सिद्धान्त हा अशा प्रकारच्या तात्त्विक भिन्न बदलाचा सूचकच ठरतो. प्रामाणिकपणें मान्य केलेल्या तत्त्वज्ञानांचीं किंवा विचारसरणींचीं राष्ट्रें जगांत गुण्यागोविंदानें नांदावीं, हें मान्य करण्यास अनुकूल तात्त्विक बैठक मार्क्सवादांत नाहीं. मार्क्सवादांत कम्युनिझमच्या ध्येयाचा व कार्यक्रमाचा स्वीकार हाच एक मार्ग मानवी प्रगतीचा मार्ग होय, अशी धारणा असल्यामुळें इतर मार्गांनीं चालणारीं राष्ट्रें अधोगतीचा पंथ आक्रमीत आहेत, असा या धारणेचा उपसिद्धांत निघतो. या धारणेच्या ऐवजीं दुसऱ्या प्रकारची धारणा शुद्ध वैज्ञानिक दृष्टिकोणांतून निष्पन्न होते ती अशीः अधिक निर्दोष असलेले समाजरचनेचे आदर्श कोणते या बाबतींत अनेक वैकल्पिक विचार मांडतां येतात; त्यांचें सत्यत्व दीर्घकालपर्यंत सामाजिक प्रयोग करूनच ठरेल; म्हणून अमूकच एकप्रकारचा समाजवादी कार्यक्रम आदर्शभूत आहे, असा निर्णय करण्यास आवश्यक तितकीं प्रयोगसिद्ध प्रमाणें माणसांना अजून मिळावयाचीं आहेत. मार्क्सवादी किंवा अन्य समाजवादी यांनीं ठरविलेले समाजरचनेचे आदर्श हीं गृहीतकृत्यें ( hypothetical ) आहेत, तीं वैज्ञानिक किंवा प्रयोगसिद्ध ( demonstrated truth ) सत्यें नव्हेत, हें प्रथम कम्युनिस्टांनीं मानलें पाहिजे. असें मानलें तरच सहजीवनाच्या धोरणाला तात्त्विक अधिष्ठान आहे, असें मानतां येईल. नाहींतर सहजीवनाचें धोरण, परिस्थिति बदलल्याबरोबर, धुडकावून लावण्याचें धाडस करण्यांतहि कम्युनिस्ट मागेंपुढें पहाणार नाहींत.

आणखी असें कीं, अशा प्रकारचा वैज्ञानिक दृष्टिकोणांतून निघणारा सिद्धांत कम्युनिस्टांनीं मान्य जरी केला नाहीं तरी त्यांना कमींतकमी दुसरा एक तात्त्विक मुद्दा मान्य करावा लागेल; तो म्हणजे शांततेच्याच मार्गानें समाजवादाकडे किंवा कम्युनिझमकडे जग जाऊं शकेल, हा होय. यापुढें वर्गयुद्ध किंवा क्रांतिकारक बंड किंवा सोव्हिएट सैन्याचें क्रांतीच्या निर्मितीकरितां आक्रमण अशा प्रकारचे उपाय न अवलंबितां, सामाजिक विशिष्ट परिस्थितीच्या दडपणानें आणि वैचारिक परिवर्तन घडवून आणून समाजवाद किंवा साम्यवाद अस्तित्वांत आणतां येईल, असा दृढ विश्वास कम्युनिस्टांच्या ठिकाणीं बाणला पाहिजे. अशा प्रकारचा विश्वास मार्क्सवादांत बसूं शकत नाहीं. तात्पर्य, मार्क्सवादांतील एक महत्त्वाचें प्रमेय बाधित केल्याशिवाय सहजीवनाचा सिद्धांत कम्युनिस्टांना प्रामाणिकपणानें स्वीकारतांच येणार नाहीं.

सहजीवनाच्या सिद्धांताची आवश्यकता अणुयुगानें निर्माण केली आहे. हेंच अणुयुग सर्वांना गंभीरपणें इशारा देत आहे कीं, 'पुढें चला! विश्वव्यापी मानवतेकडे चला! जगास जगूं द्यावयाचें असेल तर आणि मानवी समाज व मानवी संस्कृति यांचें यथायोग्य पालन करावयाचें असेल तर कम्युनिस्टांनो, तुम्ही मार्क्सवादाच्या पलीकडे चला!'

---








## पुस्तक-परामर्श

**महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा विकास** – लेखिका व प्रकाशिका प्रा. नलिनी पंडित, बांबुळी-निवास, माहीम, मुंबई १६, पानें ६+२५०, किंमत ५ रु.

एका जबरदस्त युरोपीय साम्राज्यसत्तेशीं सामना देऊन राष्ट्रीय स्वातंत्र्य हस्तगत करणें आणि मध्ययुगीन समाजजीवनामध्यें लोकशाहीच्या दिशेनें परिवर्तन घडविणें असें दुहेरी कार्य भारतीयांपुढें होतें; आणि आज शेंदीडशें वर्षांनंतर स्वातंत्र्यसंपादनाचा भाग पुरा झाला असून सामाजिक पुनर्रचनेचा पाया घातला जात आहे. या प्रचंड व बिकट कार्यांत महाराष्ट्रीय नेत्यांनीं व जनतेनें कोणती कामगिरी केली व या प्रयत्नांमध्यें कोणकोणते विचारप्रवाह निर्माण होत गेले या गोष्टींचें ज्ञान आज आपल्याला असलेंच पाहिजे. तरच पुढील कार्याची दिशा आपल्याला नीट दिसूं शकेल, अतिरेक टाळतां येतील व जास्तींत जास्त सलोख्यानें व समंजस सहकार्यानें महाराष्ट्रांतील बुद्धीचा व शक्तीचा वापर होऊं शकेल.

गेल्या शंभर वर्षांतील राजकारणाची माहिती करून देणारे ग्रंथ मराठींत नाहींत असें नाहीं. पण बहुतेकांची घडण केवळ व्यक्ति, घटना किंवा विशिष्ट पंथ (किंवा पक्ष) यांच्याभोंवतीं झालेली आहे. महाराष्ट्रांतील कायदेभंगाचा इतिहास किंवा गिरणी-कामगारांच्या संपाचा इतिहास वर्णन करणाऱ्या ग्रंथांची उपयुक्तता आहे, तसेंच व्यक्तिनिष्ठ किंवा पंथनिष्ठ ग्रंथांचीहि आपल्या परीनें मातबरी आहेच. पण आजच्या सामान्य वाचकांसाठीं असा एक इतिहास हवा कीं, ज्यांत निर्जीव वस्तुस्थितिवर्णनापेक्षां जास्त असें सम्यक् दृष्टीनें केलेलें विवरण तर आहेच परंतु तें व्यक्तिगौरवाच्या किंवा पंथाभिनिवेशाच्या दोषानें एकांगी झालेलें नाहीं.

**प्रा. नलिनी पंडित** यांच्या प्रस्तुत पुस्तकामुळें सामान्य वाचकाची ही गरज उत्तम तऱ्हेनें भागेल. शिवाय, व्यक्ति आणि पंथ यांच्या मूल्यमापनाविषयीं आपले आडाखे तपासून घेण्याची व जरूर तेवढे बदलून घेण्याची इच्छा तज्ज्ञांनाहि होईल इतकी सूक्ष्म व समतोल चिकित्सा लेखिकेनें केलेली आहे. चिकित्सेच्या समतोलपणामुळें सहजच भाषा व मांडणीहि साधी असून प्रौढगंभीर झाली आहे. एरवीं चांगल्या चांगल्या ग्रंथांतहि पाल्हाळ, पंथ-परिभाषेचा कर्कशपणा, व्यक्तिगौरव व व्यक्तिनिंदा इत्यादि जे दोष डोकावतात त्यांना टाळून लेखिकेनें जी संयमपूर्ण व सुबोध शैली वापरली आहे ती अभिनंदनीय आहे.

या ग्रंथामध्यें सन १८१८ पासून १९४७ पर्यंतच्या घटनांची पार्श्वभूमि घेतली आहे व २५० पानांच्या तोकड्या मर्यादेंत विवेचन करण्याच्या दृष्टीनें, ठळक व विशिष्ट अशाच व्यक्तींचा व प्रवृत्तींचा परामर्श घेतलेला आहे. या शतकांतील महाराष्ट्रीय व्यक्तींच्या कर्तृत्वाला व प्रवृत्तींना प्रेरणा व दिशा देणारें प्राणतत्त्व म्हणजे राष्ट्रवादच होय. हा राष्ट्रवादच एकंदर, भारतीयांच्याच नव्हे तर सर्व आशियावासींच्या जीवनाचें सूत्र बनला होता. प्रत्यक्ष वस्तुस्थितीमुळें तें अटळच होतें. ही मुख्य गोष्ट लक्षांत घेऊन लेखिकेनें आपल्या ग्रंथाला सार्थ नांव दिलें आहे. तसेंच, त्याच सूत्रानुसार उत्कृष्ट विवेचनहि केलें आहे.

ग्रंथाच्या पहिल्या ६४ पानांत राष्ट्रवादाच्या युरोपीय तत्त्वाला स्वीकारणारा मध्यमवर्ग व त्या वर्गाची जुनी मध्ययुगीन भारतीय पार्श्वभूमि यांचें थोडक्यांत वर्णन आहे. मध्यमवर्गाच्या या नव्या जाणीवेमध्यें समाजाला नवचैतन्य देण्याचें सामर्थ्य कां होतें, तसेंच या सामर्थ्याला मर्यादा कोणत्या होत्या याची आरंभीं कल्पना देऊन, मग पुढील ४२ पानांत राष्ट्र, व्यक्ति व बुद्धिवाद या आधुनिक तत्त्वांची चिकित्सा केली आहे. नुसतें या पाश्चात्य तत्त्वांचें स्वरूप न सांगतां त्यांचें आमच्या नेत्यांच्या मनांत व कृतींत जें प्रत्यक्ष रूप प्रगट झालें तेंच लेखिकेनें वाचकांपुढें ठेवल्यामुळें ही चिकित्सा फार मोलाची झाली आहे. ती थोडी अधिक विस्तारण्यास वाव असता तर उत्तम झालें असतें. पुढील ७० पानांमध्यें टिळक, आगरकर, सावरकर, गांधीजीप्रभृति कर्तृत्वशाली व्यक्तींच्या कार्याचें यशापयश व त्याची कारणमीमांसा केली आहे. न्यायमूर्ति रानड्यांपासून पुढच्या काळांतील सर्वच व्यक्तींच्या संबंधीं उलटसुलट दोषारोपांनीं गढूळलेली कडवट टीका आजपर्यंतच्या वृत्तपत्रीय व स्थिर वाङ्मयांतहि येऊन गेलेली आहे. तसेंच आंधळी पूजा बाटावी अशा गौरवाचें लिखाणहि आज पुष्कळ आहे. पण या ग्रंथामध्यें असे कोणतेच भडक रंग नाहींत. परिस्थितीच्या व संस्काराच्या मर्यादांमुळें व्यक्तींमध्यें व प्रवृत्तींमध्यें जो









छायाप्रकाश नेहमीं आढळतो तो टिपून घेतल्यामुळें एखाद्या कुशल फोटोग्राफरनें काढलेल्या छायाचित्राचें सौंदर्य त्यांच्या या चित्राला लाभलें आहे. टिळक, गांधीजी किंवा सावरकरप्रभृतींच्या असामान्य कर्तृत्वाचें वैभव वर्णन करतांनाहि त्यांनीं एक शास्त्रीय वृत्ति राखली आहे. या व्यक्तींचे गुण सांगतांना त्या आदरभाव दाखवितात व दोषहि निःस्पृहपणें दाखवून देतात. त्यांच्या या मूल्यमापनांत त्यामुळें निर्दोषपणा आला आहे. आपल्या जुन्या इतिहासांतील श्रद्धास्थानांप्रमाणेंच आधुनिक युगांतील महान् व्यक्ति व त्यांचें जीवनकार्य हीं नवीं श्रद्धास्थानें तितकींच आदरणीय आहेत. मूर्तिभंजकांची किंवा मूर्तिपूजकांची दृष्टि न ठेवतां त्यांच्याबद्दल महाराष्ट्रीयांच्या मनांत आदर व कृतज्ञताबुद्धि सतत वागत राहील अशा तऱ्हेचें विवेचन लेखिकेनें केलें आहे व तिचें हें कार्य आपल्या समाजजीवनाच्या पुढील वैचारिक घडणीच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे.

राष्ट्रवादाच्या प्रेरकतत्त्वावर भूतकाळांतून अवशिष्ट राहिलेल्या शक्तींचा आघात होणें व भविष्यकालीन आदर्शांचें संस्करण होणें अटळ आहे. ही गोष्ट चीन, इंडोचायना, भारत इत्यादि सर्वत्र देशांतून चाललेली आढळते. लेखिकेनें या अपरिहार्य घटनेची दखल घेऊन जातिवाद व वर्गवाद यांचें ग्रंथाच्या उत्तरभागांत विवेचन केलें आहे. भारतीय, व महाराष्ट्रीय राष्ट्रवादामध्यें जाति व वर्ग यांच्यामुळें उद्भवणाऱ्या संघर्षांची ही चिकित्सा फारच समतोल व स्पष्ट झालेली आहे. पानें २३५ ते २४० या पांच पानांतील साररूप विवेचनांत राष्ट्रवाद, जातिवाद व वर्गवाद यांच्या परस्परसंबंधाचें निदान करून महाराष्ट्रीय जीवनाच्या आजच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीचें फार रेखीव चित्र लेखिकेनें रेखाटलें आहे.

ग्रंथाच्या उत्तरभागांतील ( म्हणजे पानें १७७ ते २५० मधील ) सर्व मांडणी करतांना लेखिकेनें आपली स्वतःची भूमिकाहि विशद केली आहे. राष्ट्रवाद हें भारतीय समाजजीवनाचें प्राणसूत्र बनलें होतें व तें अटळच होतें, परंतु राष्ट्रवादाच्या कोषांतून बाहेर पडून समाजवादाच्या दिशेनें यापुढील वाटचाल झाली पाहिजे असा त्यांच्या विवेचनाचा रोख आहे. असें असूनहि त्यांनीं समाजवादाचें तत्त्वज्ञान स्वीकारणाऱ्या कम्युनिस्ट, प्रजासमाजवादी व रॉयिस्ट या पक्षांच्या कार्यांचें व विचारांचें निःस्पृहपणें समालोचन केलें आहे. सन १९३० ते १९४७ या सतरा वर्षांमध्यें वरील तीन पक्षांनीं जें कार्य केलें त्यांचा आढावा घेऊन त्यांनीं म्हटलें आहे कीं “ पण अशा प्रकारें वर्गभावनेस प्रोत्साहन दिलें तर अंतःकलह वाढतो आणि केवळ राजकीय ध्येयवादाचा पाठपुरावा केला, तर सामाजिक प्रगति खुंटते व राजकीय चळवळहि निःसत्त्व बनते – असा वर्गवादी कार्यकर्त्यांपुढें पेंच येऊन पडला. साम्राज्यशाहीमुळें परतंत्र राष्ट्रांत निर्माण झालेली ही समस्या सोडविण्यासाठीं राष्ट्रवाद आणि वर्गवाद यांचा वास्तववादी भूमिकेवरून मेळ घालणें जरूर होतें. पण हिंदुस्थानांतील वर्गवाद्यांना तें जमलें नाहीं. ” ( पा. २३८ )

लेखिकेनें केलेलें हें निदान बरोबर आहे याचा निर्वाळा आजची परिस्थितीच देईल. ‘ वास्तववादी भूमिकेवरून मेळ घालणें ’ ही शास्त्रीय समाजवादाची पद्धति ज्यांनीं अवलंबिली ते मावत्से तुंग, हो चि मिन्ह सारखे पुढारी आपापल्या राष्ट्राच्या उत्कर्षाचे कर्णधार बनले आहेत व उलट भारतीय समाजवाद्यांच्या ( म्हणजे मार्क्सवाद किंवा वर्गवाद स्वीकारणाऱ्या सर्वांच्याच ) पक्षांचीं विसर्जनें, अंतःकलह किंवा नुसती कुचंबणा चालू आहे. याचाच अर्थ असा कीं येथील साऱ्याच समाजवादी चळवळींत त्याग व प्रज्ञा यांची वाण नसून भारतीय वास्तवतेचें आकलन करण्यासाठीं लागणाऱ्या डोळसपणाचा, सहिष्णुतेचा व लोकांकडून शिकण्यास आवश्यक असलेल्या निरहंकार वृत्तीचा अभाव आहे. प्रस्तुत ग्रंथांत यासंबंधीचें जें विश्लेषण आहे तें केवळ पुस्तकी पढीकपणामुळें झालेलें आहे असें म्हणून डोळेझांक न करतां, प्रत्यक्ष राजकीय जीवनाशीं समरस झालेल्या कार्यकर्त्यांनीं त्याचा साक्षेपानें विचार करावा असें मला वाटतें.

आपल्या स्वातंत्र्य - संपादनाच्या व समाजपरिवर्तनाच्या प्रयत्नांमधून व व्यक्तींच्या जीवनकार्यांतून जें एक सलग चित्र निर्माण होतें तें सामान्य वाचकांसमोर ठेवणें हा या ग्रंथाचा मूळ हेतु व खरें मोल आहे. तो हेतु सफल होईल अशा पद्धतीनें व व्यासंगानें हा ग्रंथ लिहिला असल्यानें मराठी वाचकांकडून त्याचें चीज होईल अशी खात्री वाटते. नेमकी अशा ग्रंथाची उणीव








भासत होती तसाच हा ग्रंथ अगदीं योग्य वेळीं लिहिला गेला आहे व तो लिहिल्याबद्दल लेखिकेला धन्यवाद द्यावयास हवेत.

–दि. के. वेडेकर

---

**भारताचें आर्थिक जीवन.** – ले. प्रा. व. गो. सहस्रबुद्धे, अनाथविद्यार्थिगृह-प्रकाशन ( १९५५ ). पानें ५७६+१५. किंमत १० रु.

सध्यां भारतीय विद्यार्थ्यांची पदवी-परीक्षेला अर्थशास्त्र आणि तत्सम विषय घेण्याची विशेष प्रवृत्ति दिसून येते. त्यांतच देशी विश्वविद्यालयांनीं आतां प्रादेशिक भाषांच्या माध्यमांतून शिक्षण देण्याचा संकल्प केलेला आहे. अशा वेळीं या विषयांवर प्रादेशिक भाषांमध्यें पुस्तकनिर्मिति होणें अत्यंत आवश्यक आहे. मराठीमध्यें अद्यापि अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, तत्त्वज्ञान यांसारख्या विषयांवर फारशीं पुस्तकें उपलब्ध नाहींत; व अर्थशास्त्रावर तर प्रमाणभूत मानलीं जावीं अशीं फारच थोडीं पुस्तकें उपलब्ध आहेत. भारतीय अर्थशास्त्रावर तर मराठीमध्यें संपूर्ण असें एकहि पुस्तक नाहीं. या दृष्टीनें कोल्हापूर येथील ‘ राजाराम कॉलेज’मधील अर्थशास्त्राचे प्राध्यापक श्री. व. गो. सहस्रबुद्धे यांनीं या विशाल विषयावर पुस्तक लिहून विद्यार्थ्यांची एक मोठी सोय करून दिली आहे व मराठीमध्यें एका महत्त्वाच्या ग्रंथाची भर घातली आहे.

सदरहू पुस्तक मुख्यतः विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांकरतां लिहिलेलें असलें, तरी सर्वसाधारण वाचकालाहि तें उपयुक्त वाटल्याखेरीज रहाणार नाहीं. “ स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळांतील भारताच्या आर्थिक जीवनाचा समग्र, सुसंगत व सुस्पष्ट आढावा घेणारा व तो घेतांच भारताच्या आजच्या आर्थिक प्रश्नांचें सुबोध विवेचन करणारा ग्रंथ ” असें प्रकाशकानीं या ग्रंथाचें जें वर्णन केलें आहे तें हा ग्रंथ वाचून पाहिल्यावर पटण्यासारखें आहे. ह्या ग्रंथांत विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें ऐतिहासिक व आवश्यक तेथें सैद्धान्तिक व वर्णनात्मक माहिती जशी योग्य त्या प्रमाणांत सांपडते; त्याप्रमाणेंच सामान्य वाचकांच्या दृष्टीनें आर्थिक प्रश्नांचें प्रचलित स्वरूप, त्यांतील खांचखळगे, सांप्रतच्या मतप्रवाहांचें वर्णन या गोष्टीहि चटकदारपणें मांडलेल्या सांपडतात. ग्रंथकर्त्यांनीं कोणत्याहि ‘वादा’च्या आहारीं न जातां शास्त्रीय दृष्टि सांभाळूनहि रूक्षपणा टाकला आहे व जरूर तेथें त्यांनीं आपलें स्वतःचें मतहि प्रकट केलें आहे. त्यामुळें या ग्रंथाला एककल्लीपणाचा अगर फाजिल अलिप्तपणाचा दोष लागलेला नाहीं.

प्रा. सहस्रबुद्धे यांना मराठीमध्यें अर्थशास्त्रीय लिखाण करण्याचा अनुभव आहे. ‘ सुलभ अर्थशास्त्र’ व ‘ अर्थशास्त्राचा विकास ’ हीं त्यांचीं दोन पुस्तकें यापूर्वींच प्रसिद्ध होऊन मान्यता पावलीं आहत. हीं दोन्हीं पुस्तकें एक प्रकारें सैद्धान्तिक स्वरूपाचीं होतीं. परंतु प्रस्तुत पुस्तकाचें स्वरूप निराळें आहे. यांत आर्थिक तत्त्वज्ञान नसून अर्थशास्त्रीय ज्ञानाचा प्रत्यक्ष अवलंब भारतांत कशा प्रकारें झाला आहे याचें वर्णन आहे व प्रश्नांच्या चर्चेच्या ओघांत सैद्धान्तिक माहिती वापरलेली आहे. त्यांनीं प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें ‘सत्यकथन करणें ’ व ‘सत्यसंशोधन करणें ’ हेंच ध्येय त्यांनीं आपणापुढें ठेवलेलें दिसतें. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रा. सहस्रबुद्धे यांनीं, निर्विकारतेच्या आहारीं जाऊन, आपणांस पटतें त्याचाहि बुद्धिपुरस्सर अपलाप केला आहे. विशेषतः दारिद्य, बेकारी, समाजरचना, नियोजन, शेतीचें उत्पादन यांसारखे ज्वलंत प्रश्न जेव्हां ते हाताळतात, त्यावेळीं त्यांचें व्यक्तिमत्त्व प्रकट झाल्याशिवाय रहात नाहीं. अर्थात हें व्यक्तिमत्त्व पुरोगामी वृत्तीच्या विचारशील माणसाचें असल्यानें त्यानें विद्यार्थ्यांचा बुद्धिभेद होण्याचा सुतराम् धोका नाहीं. प्रा. सहस्रबुद्धे यांनीं अशा प्रकारचे प्रकट केलेले विचार बहुतेकांना पटण्यासारखेच आहेत. लोकसंख्येच्या नियोजनाखेरीज दारिद्र्याचा प्रश्न सुटणार नाहीं हा त्यांचा निष्कर्ष सर्वमान्य होण्यासारखा आहे. नुसत्या कुळकायद्यांनीं शेती सुधारणार नाहीं, तुकडेजोड लवकर केली पाहिजे, शेतमालाच्या किंमती राखून धरल्या पाहिजेत – इत्यादि मतें व भांडवलशाहीविषयींचा त्यांचा असंतोषहि पटण्यासारखा आहे.

कित्येक वेळां मात्र त्यांच्या अलिप्त रहाण्याच्या भूमिकेचा अतिरेक झालासें वाटून वाचक गोंधळांत पडण्याचा संभव आहे. शेतींतील धंदेवाईकपणा धान्यप्रश्न सोडविण्याच्या आड येत आहे परंतु खाजगी फायद्याकरतां उत्पादन जोंपर्यंत चालू आहे, तोंपर्यंत धंदेवाईकपणा केवळ अपरिहार्य म्हणून नव्हे तर इष्ट








गोष्ट म्हणून मान्यता देण्याखेरीज गत्यंतर नाहीं, असें सांगून ' याला उपाय म्हणून खाजगी फायद्याकरतां उत्पादन हा उत्पादनाचा पाया तरी बदलला पाहिजे, किंवा ज्या पिकांचें उत्पादन वाढावयास हवें त्यांच्या किंमती तुलनेनें अधिक होतील अशी योजना केली पाहिजे; परंतु तो प्रस्तुतचा विषय नव्हे. ' अशा प्रकारें ते हा महत्त्वाचा प्रश्न तसाच सोडून देतात. ह्याच प्रकारची संकोचवृत्ति त्यांनीं महत्त्वाच्या समस्या हाताळतांना दाखविली आहे. ' पाठ्यपुस्तक ' म्हणून ही अलिप्तता इष्ट असली तरी त्यामुळें लेखकाचें नक्की मत काय आहे तें कळत नाहीं व त्याचा एकंदर विवेचनाच्या मूल्यावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. जाणता वाचक अशा पुस्तकांतून थोडयाफार मार्गदर्शनाची अपेक्षा करीत असतो. भारतीय अर्थ-शास्त्रावरील पुस्तकांत विषयांना तोटा नाहीं. त्या दृष्टीनें लेखक आपापल्या परीनें विषयांना कमीअधिक महत्त्व देणारच हें खरें. तथापि या पुस्तकांत इंपीरिअल बँकेचें राष्ट्रीयीकरण व भूदानचळवळ यांसारखे विषय अगदींच त्रोटकपणें हाताळले आहेत. तसेंच जमावंदी-संबंधीचें प्रकरणहि अपुरें वाटतें. अर्थात् पृष्ठमर्यादा हेंहि या अपुरेपणाचें कारण असूं शकेल.

पुस्तकांत इतर कांहीं राहून गेलेल्या दोषांचा उल्लेख करावासा वाटतो. कित्येक ठिकाणीं पुस्तकांतील माहिती आज जुनी झाली आहे. उदाहरणार्थ ' आपली साधनसामग्री ' हें प्रकरण पहावें. यांतील उत्पादनाचे आंकडे जुने अतएव निरुपयोगी आहेत. तसेंच आपली 'चलनव्यवस्था' हेंहि प्रकरण पुन्हा उजळावयास हवें होतें. धान्योत्पादन वाढलेलें असतांना त्याबाबतचे निराशेचे उद्गार पुस्तकांत अप्रस्तुत वाटतात. तसेंच निर्नियंत्रणाचें धोरण यशस्वी झालें असतां त्याबद्दलचे अनुत्सुकतेचे उद्गार सर्वसाधारण वाचकाच्या मनांत शंका निर्माण करतील. अर्थात हा दोष म्हणतां येणार नाहीं. लिहितांना प्राप्त परिस्थितीवरच लिहावें लागतें. हल्लीं घटना झपाट्यानें घडत असल्यामुळें अद्ययावत् रहाणें कठिण असतें. हें खरें. पुढील आवृत्तींत पुस्तक शक्य तितकें अद्ययावत् करण्याचा प्रयत्न होईल अशी आशा आहे.

दुसरा दोष म्हणजे मुद्रणाचा. प्राध्यापकांनीं सांगितलें आहे कीं ते कोल्हापूरला असल्यामुळें कांहीं दोष राहून गेले. परंतु त्यामुळें कित्येक ठिकाणीं अभावितपणें विनोद निर्माण झाला आहे, तर कांहीं वेळां अर्थाचा अनर्थ झाला आहे. उदा० ' विमानवहातुकीचें ' राष्ट्रीयीकरण करण्याऐवजीं ' किमान वहातुकीचें ... ' असा प्रयोग झाला आहे ! (पृ. ५३६). तसेंच पुढील वाक्य पहा– " सुटीच्या ('तुटीच्या') अर्थव्यवहारांचें तत्त्व अलीकडे बड्या बड्या अर्थशास्त्रज्ञांनीं उचलून धरलें आहे. " या वाक्यांतील ' विनोद ' फार ' भयानक ' आहे. ( हा ' भयानक ' शब्द प्राध्यापकांचा फार आवडता दिसतो. त्याची पुनरुक्ति ' भयानकपणें ' जाणवते ! ) तसेंच पृ. ११७ वर ' सावकार व व्यापारी ' या ऐवजीं 'सावकारी व व्यापार ' अशी अदलाबदल झाली आहे. कांहीं ठिकाणीं तक्त्यामध्यें माप कशांत आहे तें दिलें नाहीं. उदा., तक्ता क्र. १ मध्यें दरमाणशीं उत्पन्न कशांत आहे तें कळत नाहीं. कांहीं ठिकाणीं तें चुकीचें दिलें आहे. उदा० पृष्ठ १६५. हा सर्वच तक्ता चुकीचा आहे. तो तयार करतांना ' माप ' कायम ठेवलें पण आंकड्यांतील उजवीकडील दोन अंक काढल्यानें उत्पादनच्या शेकडों पटीनें कमी दाखविलें गेलें आहे. उदा. काड्या पेट्यांचें माप ' हजार पेट्यांचें ' आहे व उत्पादन १९५३ सालीं ' ४७ ' असें मांडलें आहे, म्हणजे उत्पादन फक्त ४७,००० पेट्या झालें असा अर्थ होतो ! वास्तविक तें ४७,०००,००० इतकें असावयास पाहिजे. अशा चुका असणें साध्या पुस्तकांत अनिष्टच, परंतु पाठ्यपुस्तक म्हणून उपयोगिल्या जाणाऱ्या पुस्तकांत तर भयानकच होय. मुद्रण-दोषांचीं आणखी कांहीं उदाहरणें: पृ. १११– ' जेव्हां किंमती चढूं लागतात, तेव्हां तर इतर वस्तूंच्या मानानें शेतवस्तूंच्या किंमती फारच पडतात '. – येथें ' चढूं ' ऐवजी ' पडूं ' पाहिजे हें उघड आहे. अशुद्धांची आणखी कांहीं उदाहरणें– पृ. १९८ संबोधित– ( संबंधित ) पृ. ३८४ विनियम– ( विनिमय ). एकंदर छपाई स्वच्छ व सुबक असतांना वरील प्रकारचे मुद्रण-दोष किंवा मुद्रित-दोष राहून गेले याचें आश्चर्य वाटतें.

प्राध्यापकांची भाषा ओघवती आहे. कित्येक ठिकाणीं वाक्यरचना सुंदर वाटते. उदा०'शेतसारा ठरण्यांत अधिकाऱ्यांचे ग्रह, पूर्वग्रह व अनुग्रह ह्यांचाच भाग अधिक असतो. ' कांहीं चांगले प्रतिशब्द त्यांनीं निर्माण केले आहेत. उदा० स्थलांतर-सौकर्य ( Trans-








ferability ), तत्कार्यिक ( Ad-hoc ), अंदाजबाजी ( Speculation ). परंतु कांहीं शब्द तितकेसे अर्थबोधक नाहींत, व निष्कारण बोजड केल्यासारखे वाटतात. उदा० 'Rationalization' याचें 'अद्यावतीकरण' असें भाषांतर केल्यानें संपूर्ण अर्थनिष्पत्ति होत नाहीं. त्याऐवजीं तो शब्द तसाच ठेवला असतां तरी चाललें असतें. 'होतकरू धंदे' हा शब्द 'Nascent Industries' करतां चालला तरी 'होतकरू' शब्द निर्जीव पदार्थाला मराठींत वापरत नाहींत. त्याचप्रमाणें 'Discriminating Protection' याचें रूपान्तर 'संयमित' असें होऊं शकत नाहीं. त्याचें ऐवजीं 'तारतम्याचें' 'विवेकी' अशा शब्दानें अधिक अर्थनिष्पत्ति होईल. तसेंच Tariff याचें भाषांतर 'संरक्षण-कर' ( पृ. २०९ ) केलें आहे तें चूक आहे, Tariff म्हणजे नुसता 'कर'.

आणखी एक टाळतां येण्यासारखें असलेलें व्यंग म्हणजे या महत्त्वाच्या पुस्तकाला सूचिपत्राचा संपूर्ण अभाव आहे. त्यामुळें तज्ज्ञाला काय किंवा एकाद्या सामान्य वाचकाला काय एकाद्या विषयाच्या संदर्भासाठीं सबंध प्रकरणें पालथीं घालावीं लागतात. विद्यार्थ्यांनीं पुस्तकाचें अनेकवार वाचन करावें असा ग्रंथकर्त्याचा उद्देश असल्यास न कळे !

तसेंच, प्रत्येक प्रकरणाशेवटीं नाहीं, तरी पुस्तकाच्या शेवटीं तरी पुढील वाचनाकरतां उपयुक्त पुस्तकांची यादी दिली असती तर पुस्तकाची उपयुक्तता खूपच वाढली असती.

या व्यंगांचें दिग्दर्शन म्हणजें पुस्तकाच्या महत्त्वाबद्दल संशय निर्माण करणें नव्हे. वाचनाच्या ओघांत तीं खटकतात व एकंदरींत चांगल्या असलेल्या ग्रंथाला त्यामुळें निष्कारण गालबोट लागतें, एवढेंच सांगण्याचा हेतु. हें पुस्तक लिहून प्रा. सहस्रबुद्धे यांनीं मराठी अर्थशास्त्रीय वाङ्मयांत मोलाची भर घातली आहे यांत संशय नाहीं.

— प. वि. पटवर्धन

---

**महाराष्ट्रभाषेचें व्याकरणः—रचणार : जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री घगवे. संपादक : प्रा. अ. का. प्रियोळकर,** संचालक मराठी संशोधनमंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई २ ( १९५४ ), पृ. १६+५+१२८ किं. ४ रु.

कै. सर गोविंद दीनानाथ माडगांवकर-स्मारक-ग्रंथावलींत मराठी व्याकरणाच्या इतिहासांतील एका महत्त्वपूर्ण ग्रंथाचें प्रथम प्रकाशन होत आहे. खिस्ती मिशनऱ्यांनीं धर्मप्रसाराच्या सुलभतेसाठीं Arte de Lingoa Canarim (इ. स. १६४०), Grammatica Marastta ( इ. स. १८०५ पूर्वी ), Grammar of the Mahratta Language (इ. स. १८०५)—यासारखीं मराठीचीं व्याकरणें लिहिलीं आहेत. परंतु मराठी पंडितांनीं आधुनिक दृष्टीनें रचलेलें मराठीचें हें पहिलेंच मराठी व्याकरण आहे. या ग्रंथाचे लेखक जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके व बाळशास्त्री घगवे हे मुंबईच्या 'नेटिव्ह स्कूल-बुक ॲंड स्कूल सोसायटी' या संस्थेंत नोकर होते. या सोसायटीचे तत्कालीन अधिकारी जॉर्ज जर्व्हिस (Jervis) यांचेवरून त्या सोसायटीस 'जार्विस साहेबाचा कारखाना' म्हणत. इंग्रजी राज्याचे सुरुवातीस एतद्देशीय लोकांना इंग्रजी येण्यासाठीं स्वभाषेचें व्याकरण येणें आवश्यक असे. उपर्युक्त सोसायटीच्या २ऱ्या वार्षिक इतिवृत्तांत मराठी व गुजराती भाषांचीं व्याकरणें रचण्याची जरूरी प्रतिपादन केली आहे. आणि त्याप्रमाणें 'जार्विससाहेबाच्या कारखान्यां'तील क्रमवंत-फडके-घगवे या शास्त्री-त्रयानें इ. स. १८२५ च्या सुमारास प्रस्तुत ग्रंथाची रचना केली. या ग्रंथकारांपैकीं एकांच्या—गंगाधरशास्त्री फडक्यांच्या—निवेदनावरून या तिन्ही ग्रंथकारांना विचार पडला कीं 'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण कसें करावें. तेव्हां विचार करितां असें मनांत आलें कीं, ही भाषा संस्कृताश्रित होय. तेव्हां संस्कृतांत जसा प्रकृतिप्रत्ययभावविचार असाच या भाषेंतहि आहे. मग संस्कृत व्याकरणाध्ययनबलें करून महाराष्ट्र व्याकरणास आरंभ केला' ( गंगाधरशास्त्री फडके – महाराष्ट्र भाषेचें व्याकरण पृ. ३ – ६, पुणें १८३६ ). मराठीचे 'पाणिनि' दादोबा पांडुरंग यांचे

मतें, या पंडितत्रयीचा अधिकार इतका मोठा होता कीं या पंडितांचे विचारें मराठी व्याकरणाविषयीं बांधले जाणारे नियम इतरांस शिरसावंद्य व्हावेत ( तर्खडकर – **मराठी भाषेचें व्याकरण**, प्रस्तावना २–३ ). या आद्यव्याकरणाचें दुर्दैव असें कीं या व्याकरणाच्या हस्तलिखित पोथ्यांवरून मराठी व्याकरण कांहीं वर्षे पढवलें जाऊन तें विस्मृतीच्या गर्तेत जाऊन पडलें. मखबा ( इ. स. १८२५ ), स्टीव्हन्सन ( इ. स. १८३३ ), बॅलण्टाईन ( इ. स. १८३९ ) या मराठीच्या परकीय व्याकरणकारांनाच नव्हे तर दादोबा पांडुरंगांसारख्या स्वकीय, साक्षेपी विद्वानांना सुद्धां या व्याकरणाच्या अस्तित्वाची जाणीव नव्हती.

भवभूतीप्रमाणें

' उत्पत्स्यते हि मम कोऽपि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥ '

असें म्हणण्याची पाळी आलेल्या या शास्त्री–त्रयांना या ग्रंथाच्या रचनेनंतर १२५ वर्षांनीं **प्रा. अ. का. प्रियोळकर** हे अतिशय चांगले 'समानधर्मा ' मिळाले. एक विद्वान्, साक्षेपी संपादक म्हणून त्यांचे शत्रुसुद्धां त्यांना जाणतात. इंडिया ऑफिस लायब्ररींतील मराठी हस्तलिखितांच्या १९५० च्या कॅटलॉगमध्यें प्रस्तुत ग्रंथाचा सुगावा लागतांच, प्रा. प्रियोळकरांनीं त्याची मायक्रोफिल्म-प्रत आणवून एवढ्याशा साहित्यावर ( Critical apparatus ) काळजीपूर्वक संपादन करून या आद्य मराठी व्याकरणाची एक चांगली आवृत्ति सादर केली आहे. ग्रंथाच्या प्रस्तावनेंत प्रस्तुत हस्तलिखिताचा इतिहास, ग्रंथलेखनाचा काल ( इ. स. १८२५), त्या काळीं इंग्रजांच्या देखरेखीखालीं अवलंबिली जाणारी लेखनपद्धति [ उदा० चवर्गाचे दन्त्य - तालव्य उच्चार स्पष्ट दाखविण्यासाठीं तत्पूर्वी बिंदू ( 'च, 'ज इ.) वापरणें ] इ. गोष्टींबद्दल साधार विवेचन केलें आहे. याचा अर्थ त्यांचीं सर्व मतें ग्राह्य आहेत असें नव्हे. उदाहरणार्थ, प्रस्तुत पुस्तकाबद्दल ' इंग्रजी व्याकरणाचा ज्याच्यावर परिणाम झाला नाहीं असें हें मराठी भाषेचें आद्य व्याकरण आहे ' असें जेव्हां ते म्हणतात तेव्हां या विधानाच्या उलट असणारा पुरावा प्रकरण ८ ' भाषणप्रकारविचार ' ( Parts of Speech ) व पुढें प्रकरण २१ व २२ यांमध्यें मिळतो. इंग्रजी व्याकरणाच्या संस्कारांत कांहीं कमीपणा वा दोष आहेत असें मानण्याचें कारण नाहीं. इंग्रजी व पोर्तुगीझ भाषांतील मराठीचीं व्याकरणें अद्याप अभ्यसनीय आहेत. जांभेकर – तर्खडकरादि ग्रंथकारांची इ. स. १८३६-च्या सुमारास प्रसिद्ध झालेलीं व्याकरणें पाहतां, हें पुस्तक अधिक विस्तृत, व्यवस्थित व चर्चात्मक आहे. याचा अर्थ त्यांत कांहीं वैगुण्य नाहीं असें नव्हे. उदाहरणार्थ, समासविचार करतांना ( पृ. ४८ – ५५ ) या शास्त्र्यांनीं अव्ययीभाव समास लक्षांत घेतलेला दिसत नाहीं. १२५ वर्षांपूर्वी लिहिलेल्या व्याकरणाचे दोष काढण्याचा हेतु नाहीं. या व्याकरणाचा चिकित्सक दृष्टीनें अभ्यास होणें जरूर आहे एवढेंच सुचवावयाचें आहे.

प्रा. डॉ. सुनीतिकुमार चतर्जींचा उपोद्घात त्यांच्या विशाल दृष्टिकोणास व विद्वत्तेस साजेसा आहे.

प्रा. प्रियोळकरांनीं मराठी व्याकरणाच्या एका महत्त्वपूर्ण ग्रंथाचें काळजीपूर्वक संपादन केल्याबद्दल त्यांना धन्यवाद. त्यांचेकडून अशाच तऱ्हेच्या ग्रंथांची भर पडून मराठीचे उपेक्षित मानकरी प्रकाशांत यावेत अशी इच्छा व अपेक्षा आहे.

— **ग. वा. तगारे**

---

**ग्रंथव्यवहार:** लेखक : **श्री. अ. ह. लिमये**, एम्. ए.: प्रकाशक:. व्हीनस बुक स्टॉल, पुणें २. पानें १७०. मूल्य रु. ३.

हें १७० पानांचें पुस्तक **श्री. अ. ह. लिमये** यांनीं प्रकाशकांच्या माहितीकरतां आणि उपयोगाकरता लिहिलेलें आहे. श्री. अ. ह. लिमये हे गेलीं सुमारें पंधरा वर्षे ग्रंथ-प्रकाशनाच्या आणि ग्रंथविक्रीच्या व्यवहारांत समरस झालेले असल्यानें, त्यांच्या या पुस्तकांत अनुभवाचे खडे बोल जागजागीं प्रतीत झालेले आहेत. ग्रंथव्यवहार म्हणजे ग्रंथाचे लिखाण करण्यापासून तें छापून, बाजारांत विक्रीस येईपर्यंत आणि ग्राहकापर्यंत ग्रंथाची वाटचाल होईपर्यंत ज्या प्रक्रिया होत असतात, त्या सर्व प्रक्रियांची माहिती या पुस्तकांत देण्यांत आलेली आहे.

लेखक होऊं इच्छिणाऱ्यानें किती गोष्टींचा अभ्यास बारकाईनें केला पाहिजे याची सुंदर माहिती ' ग्रंथाचा लेखक व लेखन ' या प्रकरणांत देण्यांत आलेली आहे. ज्यांना आपलें पुस्तक छापून काढावयाचें असेल, त्यांनीं












आपली. ' मुद्रणप्रत ' किती काळजीपूर्वक केली पाहिजे याची अत्यंत काळजीपूर्वक सुसंगत माहिती देण्यांत आली आहे. लेखकानें व प्रकाशकानें 'मुद्रणप्रत' तयार करतांना जर योग्य काळजी घेतली, तर ' मुद्राराक्षसां'चा संभव कमी होईल आणि वेळच्या वेळीं पुस्तकें छापून होणें शक्य होईल. आपलें लिखाण झालें कीं आपली मर्दुमकी संपली, असें पुष्कळदां लेखकास वाटतें. पण तें बरोबर नाहीं. पुस्तक मुद्रित होऊन प्रकाशांत यावयाचें असतें आणि त्यासाठीं ' मुद्रणप्रत ' फार काळजीपूर्वक करावी लागते, याबद्दलच्या या पुस्तकांत दिलेल्या सूचना लेखकांनीं ( आणि प्रकाशकांनीं ) जरूर अंमलांत आणल्या पाहिजेत. प्रकाशनाचा धंदा करणाऱ्या व्यक्तीस निरनिराळ्या कायद्यांची माहिती आवश्यक असते. नहून प्रकाशक कायद्याच्या कचाटींत सांपडण्याचा संभव असतो. ग्रंथकर्त्यानें कॉपीराईट ॲक्ट व कॉन्ट्रॅक्ट ॲक्ट या दोन कायद्यांची माहिती थोडक्यांत दिली आहे. लेखकांस मानद्रव्य कोणत्या तऱ्हेनें द्यावें, याबद्दलच्या प्रचलित पद्धती आणि त्या संबंधींच्या करारांची माहितीहि ग्रंथकर्त्यानें दिली आहे. ग्रंथाची किंमत कशी ठरवावी, त्याची जाहिरात व इतर खर्च कसा करावा, प्रकाशनसमारंभ कोणत्या तऱ्हेनें करावा याबद्दची मोठी बोधप्रद माहिती ' ग्रंथाचा प्रकाशक व प्रकाशन ' या प्रकरणांत देण्यांत आली आहे. अलीकडे पुस्तकांचे प्रकाशनसमारंभ करण्याची फशन पडत गेली आहे. या समारंभाचा किती उपयोग होतो, याबद्दल लेखकांसहि शंका असावी असें वाटतें. असल्या समारंभानें पुस्तकाची थोडीशी जाहिरात होत असेल, पण खप किती वाढतो याबद्दल शंका वाटते. कित्येक वेळां हे सभारंभ तर हास्यास्पदच ठरलेले आहेत. प्रकाशकानें आपलें वचन, करार व वायदे पाळले पाहिजेत हें निग्रहानें सांगितलें आहे. या बाबतींत प्रकाशक योग्य काळजी घेत नाहींत आणि त्यामुळें प्रकाशनधंद्याला प्रतिष्ठा लाभली नाहीं. ' ग्रंथाचा मुद्रक आणि मुद्रण ' या प्रकरणांत दिलेली २८ पानी माहिती ही ग्रंथव्यवहारांत इतकी आवश्यक नाहीं व त्याची इष्टताहि पण नाहीं. प्रकाशकाचा आश्रयदाता म्हणजे विक्रेता असें लेखकानें म्हटलें आहे व तें योग्यच आहे. पुस्तकविक्रेत्यानें पुस्तकांच्या विक्रीची जर काळजी घेतली नाहीं, तर पुस्तकें धूळ खात पडतील. प्रकाशक आणि गिऱ्हाईक यांच्यामधील पुस्तक - विक्रेता हा महत्त्वाचा दुवा आहे. पण त्याची योग्य दखलगिरी प्रकाशकहि घेत नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे. पुस्तकविक्रेत्यासहि आपलें स्थान अजून समजलें नसावें अशी भीति वाटते. श्री. लिमये यांनीं पुस्तकविक्रेत्यानें आपला माल खपविण्यासाठीं किती तऱ्हेनें काळजी घ्यावी याचें मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. ते एके ठिकाणीं म्हणतात : "समाजांतील खळबळजनक गोष्टी, राजकारण, लफडीं - प्रकरणें यांची चर्चा करण्याचे अड्डे म्हणजे दुकान नव्हे. " श्री. लिमये यांचें हें म्हणणें शंभर टक्के बरोबर आहे. या ठिकाणीं दुकान याचा अर्थ कोणतेंहि धंद्याचें ठिकाण अशा व्यापक अर्थानें घ्यावयास पाहिजे आहे, हें विसरून चालणार नाहीं. मराठी वाङ्मय कां खपत नाहीं याबद्दल लेखकानें केलेली मीमांसा विचारार्ह आहे. समाजांतील फुकटांत वाचण्याची प्रवृत्ति कमी झाली पाहिजे हें जितकें खरें, तितकेंच समाजाला काय हवें याचा विचार प्रकाशकांनीं केला पाहिजे असें सुचवावेसें वाटतें. लोकांची क्रयशक्ति किती आहे, आणि आपलें वाङ्मय हें किती लोक समजूं शकतील याचा विचार लेखकांनीं आणि प्रकाशकांनीं करावयास पाहिजे आहे. " हीन दर्जाचीं पुस्तकें यांचा सध्यां ज्या प्रमाणांत प्रसार होत आहे, त्यावरून आपल्या वाचकांच्या अभिरुचीची कल्पना येते." असलें वाङ्मय लिहिणारे जर निरनिराळ्या प्रसंगीं आणि वारंवार अध्यक्षपद भूषित करूं शकतात, तर समाजाला दोष देण्यांत काय फायदा ? समाजाचे धुरीण जेव्हां असल्या वाङ्मयकंटकांचा कडाडून निषेध करतील, त्याच वेळीं हीन वाङ्मयास आळा बसेल. पण तसें आज समाजाचा धुरीण वर्ग करीत नाहीं. असो.

'ग्रंथव्यवहार' हें पुस्तक धंद्यासंबंधीं आहे आणि अशा स्वरूपाचीं पुस्तकें फारच दुर्मिळ. लेखक, प्रकाशक व ग्रंथविक्रेता या सर्वांना उपयोगी पडेल असें हें संग्राह्य पुस्तक श्री. लिमये यांनीं लिहिलें आहे. पुस्तकविक्रेत्याची भाषा इतकी ओघवती आणि सहजसुंदर कशी आहे याचा विचार मनांत येऊन कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं लेखकाची ' अंतरींची तळमळ ' जाज्वल्य दिसून येते. त्यांनीं आपला व्यवसाय करतांना जें सूक्ष्म निरीक्षण केलें, त्याचें प्रतिबिंब सदर पुस्तकांत उमटलें आहे. त्यांचा बुडत्या प्रकाशकांशीं संबंध कदा-










चित् कमी आला असेल. म्हणून श्री. लिमये यांनीं त्यासंबंधीं विशेष उल्लेख केला नाहीं. प्रकाशक-संस्था कां बुडाल्या आणि कां बुडतात याबद्दलची थोडीशी माहिती या पुस्तकांत असती तर बरें झालें असतें. ही माहिती नवीन प्रकाशकांस दीपगृहासारखी व्यवसायांतील धोका दर्शविणारी झाली असती.

— वि. अ. पटवर्धन

---

## पत्रव्यवहार

### मॅनेजिंग एजन्सीचें कार्य !

संपादक, ' नवभारत ' यांस,

सा. न. वि. वि.

जुलै ( १९५५ ) च्या अंकांत **श्री. मधुकर जावडेकर** यांनीं **मॅनेजिंग एजन्सी पद्धती-( संस्था नव्हे )** ची तरफदारी केली आहे. यांच्या एकंदर म्हणण्याचा रोख नीटसा लक्षांत येत नाहीं. तरी त्यांचीं कित्येक विधानें दिशाभूल करणारी असल्यानें त्यांबद्दल लिहिणें प्राप्त आहे.

प्रथमतः मॅ० एजन्सीचें कार्य सांगतांना बऱ्याचशा गोष्टींचा उल्लेख केला नाहीं. " मॅ. एजंटांनीं स्वतः-च्या जामिनकीवर मिळविलेल्या " कर्जाची बढाई मारण्याचें प्रयोजन काय ? त्यांची स्वतःची जामीनकी म्हणजे तरी काय ? कुठल्यातरी गिरणीचे, कारखान्याचे अगर अन्य प्रकारच्या कंपनीचे मॅ. एजंट म्हणूनच त्यांना बँकाकडून कर्ज मिळालें. त्यांत बढाई मिरविण्यासारखें कांहींच नाहीं. गिरणी, कारखाना अगर कंपनीतर्फे कुणीं तरी कर्जखतावर सही केलीच पाहिजे आणि ' ज्याच्या हातीं शिकार तो पारधी ' या न्यायानें मॅ. एजंटांचीच सही ग्राह्य ठरते.

दुसरी बाब ' कमिशन अजीबात ' सोडल्याची. या त्यागाबद्दल श्री. जावडेकरांची कांहीं तरी विपरीत कल्पना दिसते. एरवीं या ओझ्यानें ते इतके भारवते ना ! मॅ. एजन्ट कमिशन / वेतन घेत नाहींत किंवा सोडून देतात, त्याचें मुख्य कारण कंपनीच्या प्राथमिक अवस्थेंत कामाला त्याप्रमाणें सुरवात झालेली नसते अगर तोटा येतो. त्यावर एजंटांच्या वेतन / कमिशनची रक्कम मिळविल्यास तोटा अधिक होईल — भागीदार ओरड करतील, अधिक भांडवल जमणार नाहीं ... अशा दीर्घ विचारानें — सर्वस्वीं स्वार्थी वृत्तीनें — ते हें ' त्यागा'चें नाटक करतात. त्यांनीं आपण होऊन तसें केलें नाहीं तर डायरेक्टर्स / भागीदार त्यांना तसें करायला भाग पडतात. हा सर्व प्रकार अनभिज्ञतेमुळें श्री. जावडेकरांना ठाऊक नाहीं असें वाटतें. नाहींतर त्यांनीं " वेतन सोडून दिलें " " कमिशन घेतलें नाहीं " — म्हणून उपकारपर्वत झाल्यागत मॅ. एजंटांची थोरवी गाइली नसती.

" स्वतःच " भांडवल पुरवठा केल्याबद्दलहि मॅ. एजंटांची पाठ थोपटण्यास श्री. जावडेकर धावतात. मॅ. एजंट म्हणजे कंपनी, कारखाना, गिरणी — काय वाटेल तें असो चालविण्यासाठीं नेमलेला सर्वसत्ताधाऱ्यासारखा अधिकारी. त्यांनीं हें केलें अन् तें केलें, म्हणून त्याची फुशारकी मारण्याचें काय कारण ? हें सर्व व आणखीहि जरूर असेल तें सगळें करण्यासाठीं तर मॅ. एजंट नेमला. जें कर्तव्य आहे तें केलें नसतें तर ठपका आला असता, नाचक्की झाली असती !

' टॅक्सेशन एन्क्वायरी कमिशन ' — ( डॉ. जॉन मथाई ) च्या रिपोर्टांमधील भाग १— प्रकरण ७ (पत्रकें १५,२६,३१–३४ ), तसेंच छेदक ( ५० ) यांत आलेली माहिती श्री. जावडेकरांनीं अवश्य वाचावी अशी विनंति आहे.

आणखीहि इतर बाबतींत— अपुऱ्या माहितीवर आधारलेली मॅ. एजंटांची तरफदारी श्री. जावडेकरांनीं करावी याबद्दल आश्चर्य वाटतें. क. लो. अ. ही वि.

१५-७-५५

श्री. रा. टिकेकर

मुंबई ४










मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

卐 卐 卐 卐







